

# हिमकलिका

[ लघुकथासंग्रह ]



संपादिका

राजकुमारी **अक्कासाहेब पन्त**, औंध.



आवृत्ति पहिली ] किंमत ८ आणे. [ सन १९३५

# निवेदन

औंध संस्थानांतील कांही साहित्यसेवकांनी वाक्-तुषारांनी सिंचित करून प्ररूढतेनें डोलविलेली ही ' **हिमकलिका** ' सहृदय रसिकांच्या मनोविनोदनार्थ वाङमय-वाटिकेंत आरोपित करण्याचें साहस मी करीत आहें. गतवर्षी अशाच पद्धतीनें ' **भावलेखा** ' हा काव्यसंग्रह मी प्रसिद्ध केला होता. त्या आमच्या पहिल्याच प्रयत्नाचें रसिकांनी माझ्या अपेक्षेहून अधिक सौजन्यानें व आपुलकीनें कौतुक केलें. त्याबद्दल मी त्यांची ऋणी आहें.

औंध संस्थानांतील सहा लेखकांच्या लघुकथांचा हा प्रातिनिधिक संग्रह आहे. श्रीयुत वा० ना० देशपांडे, श्रीयुत ताम्हणकर यांच्यासारख्या प्रथितयश लेखकांच्या बरोबर कांही अप्रसिद्ध लेखकांच्या कृतीही प्रसिद्ध होत आहेत. 'हिम-कलिके' ला आठ पाकळ्या आहेत. त्या ( कथा ) सर्वच लघुकथेंच्या तंत्रांत बसतील, असें मुळीच नाही. लघुकथे-

बरोबरच भावकथा, शब्दचित्र, गद्यकाव्य, यांपैकी कांही प्रकार या कलिकेंत वाचकांना आढळून येतील. त्यामुळेच या कलिकेंत वर्णवैचित्र्याबरोबर गंधवैचित्र्यही रसिकांना अनुभवास येईल. कलिकेंतील सर्वच पाकळ्या परिमलयुक्त असूनहि त्या परस्परांहून भिन्न नसतात का ?

हिम म्हणजे थंडी—थंडीच्या दिवसांत उत्पन्न होणारी कलिका आहे ही. ही ' हिमकलिका ' एखाद्या नामांकित साहित्यिक माळ्याच्या हस्तें रसिकांच्या भेटीस सादर करतां आली असती तर वडील बंधु—भगिनींनी साहित्य—प्रांगणांत चोखाळलेल्या मार्गांत कदाचित् ही कलिका अधिक खुलावट धरून, रसिकांचें मनरंजन करीत राहिली असती; पण ही मुग्ध कलिका माझ्यासारख्या बालिकेच्या हस्तेंच आपलें वर्ण—गंध—वैचित्र्य सूचित करीत साहित्योद्यानांत प्रवेश करीत आहे. अजून ती प्रफुल्लित झाली नाही. अर्थात् तिचें सौंदर्य व परिमळ अस्फूटतेने व्यक्त होणार ! तिचा परिमळ दशदिशांत दरवळून जाण्यास अजून थोडा कालावधि आहे. या हिमकलिकेच्या गूढ, मधुर परिमलाने रसिक—हृदयांत किंचित् गोड संवेदना उत्पन्न झाल्या, तरी माझा हा यत्न सफल झाला, असें मी समजेन.

'हिमकलिका' रसिक वाचकांना सादर करतांना मला ज्यांनी ज्यांनी सहाय्य केलें आहे, त्यांचा उलेख करणें हे माझें कर्तव्यकर्म आहे. संग्रहांतील सर्व लेखकांनी मी विनंती करतांच विलंब न लावतां लघुकथा पाठवून दिल्या. कलिकेच्या

सौंदर्यांत अपूर्व भर घालण्यांत तरुण चित्रकार त्र्यं० कृ० पाटील यांनी सहाय्य केलें. भारत–मुद्रणालयाच्या चालकांनी अगदी अल्पावधींत संग्रह छापून दिला. या सर्वांची मी ऋणी आहें.

याशिवाय ज्या ज्या हितचिंतकांच्या सहाय्याशिवाय हें पुस्तक, आहे या स्वरूपांत प्रकाशित होऊं शकलें नसतें, त्यांचे औपचारिक आभार मानून मोकळें होण्यापेक्षा त्यांच्या उपकारांतच राहिलेलें बरें.

औंध,
मार्गशीर्ष वद्य षष्ठी.

कु० **अक्कासाहेब पंत.**



# हिमकलिका

## दल-विस्तार



*

# हिऱ्याची गुंडी.

( लेखक—श्री० वाग्भट नारायण देशपांडे,
बी. ए., एलएल्. बी. )

त्या हिऱ्याच्या गुंडीमागे थोडासा कौटुंबिक इतिहास होता. भाऊसाहेबांचे वडील दादासाहेब पूर्वी त्या संस्थानचे दिवाण असतांना त्या वेळचे चीफसाहेब अज्ञान असल्यामुळे राज्यकारभाराचे सर्वाधिकार त्यांच्या मातोश्री राणीसाहेब आणि दिवाण या दोघांस दिले होते. हा प्रसंग घडला त्या वेळी चीफसाहेबांचें वय सुमारें पंधरा-सोळा वर्षांचे असेल. गव्हर्नरसाहेबांची संस्थानच्या राजधानीस भेट व्हावयाची होती, म्हणून पोलिटिकल एजंटांचा मुक्काम तेथे आला होता. गव्हर्नरांच्या स्वागतासाठी स्टेशनवर जाण्याकरिता बाळराजे आपल्या वाड्यांत सज्ज

❀

होऊन बसले. त्यांची दरबारी चार घोड्यांची गाडी एजंट-साहेबांस त्यांच्या बंगल्यावरून वाड्यांत घेऊन आल्यावर, राजेसाहेब त्यांजबरोबर या गाडीतून स्टेशनावर जाणार आणि दिवाण मागून दुसऱ्या गाडीतून जाणार असें ठरलें होतें. एजंटांची गाडी येतांच बालराजे खाली गेले व आपल्या दरबारी गाडीत चढूं लागले; तोंच एजंट म्हणाले, " चीफ-साहेब! आपल्याला आज या गाडीत बसतां येणार नाही!"

" कां? " बालराजांनी आश्चर्यचकित होऊन विचारलें.

" ही गाडी गव्हर्नरांसाठी म्हणजे महाराणीसाहेबांच्या प्रतिनिधीसाठी आहे. गव्हर्नरांच्या अभावी त्यांचा प्रतिनिधि म्हणून मी बसलों आहें. आपण महाराणी सरकारचे मांड-लिक आहांत, तेव्हा आपल्याला या गाडीत आज बसतां येणार नाही. आपण मागल्या दिवाणसाहेबांच्या गाडीतून या. " असें बोलून एजंट साहेबांनी आपली गाडी हाकली सुद्धा!

मातोश्री राणीसाहेब वाड्यांतून हा प्रकार पहात होत्या. एजंटसाहेबांच्या या वर्तनाने आणि कोटिक्रमाने सर्वच हतबुद्ध झाले. बालराजांच्या मनाला तर तो अपमान फारच जाणवला; इतका की, त्यांच्या डोळ्यांत, आपण चौघांत उभे आहोंत हें लक्षांत न राहून, टच्‌दिशी पाणी सुद्धा आलें. दिवाण प्रसंगावधान राखून पुढे झाले. त्यांनी बालराजांचा हात धरून त्यांना गाडीत घेतलें व म्हटलें, " सरकार! आपण मनाला इतकं वाईट मुळीच वाटून घेऊं नका. एजटानं केलेल्या या अपमानाचं प्रायश्चित्त त्याला आजच देऊं. मात्र मी सुचवितों ती युक्ति आपण करा म्हणजे झालं. "

बालराजांचें आणि दिवाणांचें संभाषण होत आहे, तोंच त्यांची गाडी स्टेशनवर आली. तेथे गव्हर्नरांच्या स्वागताची सगळी तयारी होतीच. गव्हर्नरांची स्पेशल आली, नामदारांची स्वारी खाली उतरली, हस्तांदोलन सलामी वगैरे सर्व झालें आणि बालराजे गव्हर्नरांसह स्टेशनच्या बाहेर आले. दरबारी गाडी पायऱ्यांजवळ उभी होतीच. तींत बालराजांनी गव्हर्नरांना बसविलें आणि आपण खालीच उभे राहिले. राजेसाहेब गाडींत चढतील म्हणून गव्हर्नरांनी क्षणभर वाट पाहिली; पण राजेसाहेबांनी कोचमनला गाडी हाकण्याचा हुकूमहि दिला. तो ऐकतांच गव्हर्नरांनी आश्चर्यचकित होऊन विचारलें–

' म्हणजे? आपण नाही येत या गाडींत? '

' ही गाडी आपल्यासाठी, म्हणजे महाराणीसरकारच्या प्रतिनिधीसाठी असून, मी मांडलिक असल्याने मला या गाडींत बसण्याचा अधिकार नाही, अशी मला आताच एजंटसाहेबांनी समज दिली आहे आणि म्हणून स्टेशनवर येतांना ते एकटेच या गाडींतून पुढे आले. तेव्हा आपण एजंटसाहेबांच्या समवेत पुढं चलावं; मी दिवाणसाहेबांच्या गाडींतून आपल्या मागोमाग आलोंच !'

ते जुने दिवस संस्थानिकांना आजच्यापेक्षा जास्त आदराने व सन्मानाने वागविण्याचे असावेत म्हणून असो, किंवा गव्हर्नर जात्या फार चांगले गृहस्थ असावेत म्हणून असो, पण पोलिटिकल एजंटने बालराजांचा असा अपमान केलेला ऐकून गव्हर्नर संतप्त झाले, हें मात्र खरें. त्यांनी क्रूर मुद्रेने

पोलिटिकल एजंटाकडे क्षणभर पाहिलें आणि म्हटलें, " या पोलिटिकल एजंटांना खऱ्या दरबारी रिवाजांची अद्यापि माहिती नाही तर ! राजेसाहेब! आपणच या गाडींत आलें पाहिजे. एजंट मागून दिवाणांबरोबर येतील ! "

वास्तविक गव्हर्नर आणि राजेसाहेब यांच्याबरोबर दरबारी गाडींतून जाण्याचा एजंटांचा मान असतां, त्यांना मागल्या दिवाणांच्या गाडींतून यावयास लावून त्यांच्या उद्धटपणाचें जाहीर प्रायश्चित्त गव्हर्नरांनी त्यांना याप्रमाणें लागलीच दिलें. गव्हर्नरांची व एजंटांची एकांतीं मुलाखत झाली त्या वेळीं काय बोलणें झालें तें बाहेर येणें अर्थातच शक्य नव्हतें. परंतु प्रकृति एकाएकी अस्वस्थ झाल्यामुळे पोलिटिकल एजंटांना त्यानंतर गव्हर्नरांच्या दरबारला आणि खान्याला हजर मात्र राहतां आलें नाही. त्यांची ती प्रकृति लवकरच इतकी बिघडली की, गव्हर्नरांचा त्या संस्थानांतला मुक्काम संपल्यावर एकदोन आठवड्यांतच पोलिटिकल एजंटांना रजा घेऊन स्वदेशीं जावें लागलें. जाण्याआधी त्यांना राजेसाहेबांची गाठ घेऊन केल्या अपमानाबद्दल त्यांची क्षमा मागावी लागली, असेंहि लोक त्या वेळीं बोलत.

दिवाणसाहेबांच्या चतुराईमुळे आपल्या मुलाच्या अपमानाचा असा भरपूर मोबदला मिळून त्याचा बोज राहिला, यामुळे थोरल्या राणीसाहेब मात्र खूष झाल्या. त्यांनी आपल्या बोटांतल्या आंगठींतला मोलवान् हिरा काढून, तो एका सोन्याच्या गुंडीवर बसविला व ती गुंडी दिवाणसाहेबांना आपली आठवण म्हणून आग्रहपूर्वक नजर केली.

दादासाहेबांना त्या गुण्डीबद्दल शेवटपर्यंत फार अभिमान व प्रेम वाटे. थोरल्या राणीसाहेबांची आठवण म्हणून ती ते आपल्या शर्टाला आणि सदऱ्याला सदैव वापरीत. आपल्या शेवटच्या दुखण्यांत मरणसमयीं दादासाहेबांनी ही गुण्डी आपल्या एकुलत्या एक मुलाच्या हातांत देऊन सांगितलें, "मला ही गुण्डी आपल्या थोरल्या राणीसाहेबांनी दिलेली तुला माहीत आहेच. हिचा इतिहासहि तुला मी सांगितला आहे. ही गुण्डी आपल्या घराण्यांत राणीसाहेबांची आणि माझीहि आठवण म्हणून सदैव रहावी अशी माझी इच्छा आहे, म्हणून ही मी तुला देतों. ती तूं स्वतः वापर आणि पुढे तुला मुलगा होईल त्याला दे. मला ती गुण्डी शकुनाची झाली आहे. तिची नीट काळजी घ्या!"

— २ —

ही ऐतिहासिक महत्त्वाची गुण्डी सकाळपासून सापडेनाशी झाल्यामुळे भाऊसाहेब आज सारा दिवस बेचैन झाले होते. सकाळीं स्नानाला जातांना आपण ती मधल्या घरांतील मोठ्या टेबलावर ठेवल्याचें त्यांना आठवत होतें. आंघोळ करून बाहेर येतात तोंच कोणी मोठे पाहुणे अकस्मात् आल्यामुळे ते लगबगीने बाहेर गेले आणि गुंडी टेबलावर तशीच विसरून राहिली. दुपारभर त्या पाहुण्यांच्या बरदास्तींत आणि त्यांच्याशीं बोलण्यांत वगैरे गुन्तल्यामुळे चार वाजतां चहा घेईपर्यंत भाऊसाहेबांस तिची आठवण झाली नाही. त्यांचा स्वभाव जरासा विसरभोळा होता;

तरी ते या गुण्डीच्या बाबतींत सहसा कधी विसरत नसत. यदाकदाचित् गुंडी कोठे विसरलीच तर ती न्हाणीघरांत किंवा मधल्या घरांतल्या टेबलावर; आणि तीहि त्यांच्या पत्नी अक्कासाहेब किंवा त्यांच्या खास दिमतींतला नोकर बंडू लागलीच उचलून आणून त्यांच्याजवळ देत असत. कारण त्या गुण्डीची गोष्ट आणि तिचें ऐतिहासिक महत्त्व त्यांच्या घरांतल्या प्रत्येकाला वारंवार ऐकून माहीत झालें होतें. कोणी घरांत नवखा स्नेही अगर पाहुणा आला तर त्यालाहि कांही ना कांही तरी संबंध लावून, या गुंडीचा हा इतिहास भाऊसाहेबांनी अभिमानाने सांगावयाचाच. भाऊसाहेबांची ही हिऱ्याची गुण्डी त्यांच्या मित्रमंडळींत अगदी प्रसिद्ध झाली होती. त्यांना खूष करावयाचें अगर खुलवावयाचें असेल तेव्हा त्या गुंडीचा विषय काढून, तिचा इतिहास त्यांना सांगावयाला लावावयाचें, ही त्यांच्या मित्रांची एक ठराविक युक्ति होती आणि भाऊसाहेबांच्याहि तें लक्षांत न येतां तोच तो इतिहास पुनः पुनः सांगण्याचा त्यांना कधी कंटाळा येत नसे.

चहा घेतांना सहज गळ्याकडे हात जाऊन तेथे गुंडी नसल्याची भाऊसाहेबांना आठवण झाली आणि मग त्यांचा गोंधळ काय विचारावा? गुण्डी ठेवलेल्या टेबलावर तर नव्हतीच, न्हाणीघरांतहि नव्हती. ती कसून शोधण्याबद्दल घरांत सर्वांना हुकूम सुटले. नोकर सर्व जुने व विश्वासू असल्यामुळे त्यांपैकी कोणी ती चोरतील असा संभवच नव्हता. चहूकडून गुंडी शोधूनहि ती सापडेना, तेव्हा मात्र भाऊसाहेबांचा जीव फारच घाबरून गेला. इतक्यांत त्यांच्या डोक्यांत एक कल्पना

येऊन त्यांनी विचारलें, " अरे, भय्याला विचारा बरं, त्यानं ती घेतली आहे का म्हणून ? "

पण भय्या नुकताच खेळण्यासाठी कोठे बाहेर गेला होता. मोटार त्याच्याबरोबर गेली होती, ती त्याला घेऊनच परत येणार होती, त्यामुळे तो संध्याकाळी परत येईपर्यंत थांबणें भागच पडलें. तरीसुद्धा त्याला तेथे भेटून गुंडी त्याला सापडली कीं नाही, याचा नसता शोध घेऊन येण्यासाठी एका नोकराची रवानगी झालीच. त्याने जेव्हा तासाने परत येऊन सांगितलें की, भय्यासाहेबांनी ती गुंडी ठेवली असून परत आल्यावर देतों म्हणून त्यांचा निरोप आहे. तेव्हा कोठे भाऊसाहेबांचा जीव जरा स्वस्थ होऊन घरांत सर्व व्यवहार पूर्ववत् चालू झाले.

भय्या हा भाऊसाहेबांचा आठ वर्षांचा एकुलता एक मुलगा. फारच चलाख आणि गोड मुलगा होता. तो झाला त्या बाळंतपणांत अक्कासाहेबांना कांही विकार जडून त्याच्या पाठीवर दुसरें मूल फिरून झालेंच नाही व तें होण्याचा संभवहि डॉक्टरी शास्त्राप्रमाणे दिसत नव्हता. यामुळे भाऊसाहेब आणि त्यांच्या पत्नी अक्कासाहेब यांचाच काय, पण घरांतल्या हरएकाचा जीव त्या एका मुलावरच केंद्रीभूत झाला होता. एकुलतीएक मुलें असतात ती सामान्यत: लाडावलेलीं आणि हट्टी होतात; पण छोट्या भय्याच्या बाबतीत तसे कोणालाहि म्हणतां आलें नसतें. त्याचा समजदारपणा आश्चर्यकारक होता. त्याने कधी कोणाची खोडी केली, भांडणतंटा केला, हट्ट केला, असें कधीच झालें नाही. एखाद्या गोष्टीचा त्याने

नाद घेतला तरी, भाऊसाहेबांनी त्याला समजावून सांगतांच त्याला पटत असे. त्याचा भाऊसाहेबांवरील विश्वास व श्रद्धा आश्चर्यकारक होती. आपल्या आईपेक्षा सुद्धा त्याला भाऊ-साहेबांचें म्हणणें विशेष पटे. एकदा एका थंडीच्या दिवशीं अक्कासाहेबांनी त्याला म्हटलें, 'अरे भय्या, आज थंडी आहे, अंगांत उबेचा स्वेटर घाल बरं ! ' तेव्हा त्याने लागलीच वडिलांच्याकडे येऊन विचारलें, 'भाऊ, अक्का म्हणते, 'आज थंडी आहे, स्वेटर घाल ' आज थंडी आहे का हो ? '

भय्या संध्याकाळीं घरीं परत येईपर्यंत भाऊसाहेब बाहेर गेलेच नाहीत. त्यांना शर्टला लावायला दुसरी गुंडी नव्हती असें नाही; पण त्यांना वाटलें, न जाणो, भय्या पोर आहे; तो येतांच आपली ऐतिहासिक गुंडी मागून घेतलेली बरी. तो ती कोठे टाकणार नाही, पण पोराच्या हातून विसरतेपणीं पडलीच तर त्याचा काय नियम?

भय्या घरीं येतांच भाऊसाहेबांनी त्याला हाक मारण्याच्या आंत स्वतःच ती गुंडी घेऊन दिवाणखान्यांत ते वर्तमान-पत्र वाचीत बसले होते तिकडे तो गेला.

'भाऊ! ही पहा तुमची गुण्डी ! मधल्या घरांत होती ती मी उचलून ठेवली. ' गुंडी पाहतांच भाऊसाहेबांचा जीव एकदम खाली पडला. त्यांनी ती उल्हासाने भय्याच्या हातांतून घेतली आणि लागलीच गळ्यास लावली. त्यांनी भय्याला प्रेमाने जवळ घेऊन त्याचा मुका घेतला व म्हटलें, " बाळ! तूं आहेसच तसा शाहणा. माझी खात्री होतीच की, गुंडी नीट जपून ठेवशील म्हणून. '

भय्या नेहमीप्रमाणे त्यांच्या मांडीवर पडला व म्हणाला, ' भाऊ ! ती गुंडी किती छान आहे, नाही ? मला द्या ना ती ? ती मी जपून ठेवीन, कध्धी हरवणार नाही.'

' बाळ !' भाऊसाहेबांनी त्याला कुरवाळून उत्तर दिलें, ' ती गुंडी पुढं तुलाच द्यायची आहे. दादांनी मला ती शेवटीं दिली आणि माझ्या म्हातारपणीं ती तुला द्यायला सांगितली म्हणून वास्तविक ती तुझीच आहे. कांही वर्षं मी आपली ती वापरणार, इतकंच ! '

भाऊसाहेबांचा हा खुलासा ऐकून भय्यास फारच आनंद झाला. गुंडीवर खरी मालकी आपली असून आपले वडील ती आपल्या संमतीने वापरणार, या गोष्टीचा त्याला फारच अभिमान वाटला. आपल्या आवडत्या बापावर मेहरबानी करण्याची संधि घालवितां उपयोगी नाही असें वाटून तो उल्हासाने म्हणाला, 'हां, जरूर. तुम्ही ती गुंडी म्हातारपणा-पर्यंत जरूर वापरा. मग मी म्हातारा झाल्यावर मी ती माझ्या मुलाला देऊं ना ? '

मुलाच्या या प्रश्नाची व त्याने उल्हासाने दिलेल्या संमतीची भाऊसाहेबांना फार मौज वाटली. त्यांनी त्याला पुन्हा कुरवाळलें व म्हटलें, ' हो, तूं ती मग पुढं आपल्या मुलाला दे. '

' मग ती तो फिरून आपल्या मुलाला देईल ? ' भय्याने पुन्हा प्रश्न केला.

' अर्थात् ! '

' मग असं कुठपर्यंत चालेल हो ? '

' पिढयान् पिढ्या. जोंपर्यंत ही गुंडी अन् आपलं घराणं आहे तोंपर्यंत ! '

' अन् मध्येच ही गुंडी कुणी हरवली तर ? '

' पण ती कुणी हरवायर्चा नाहीच मुळी. दादांनी तसं मुद्दाम सांगितलंच आहे. '

' पण, भाऊ! गुंडी हरवूं नये म्हणून न वापरतां तशीच ठेवून दिली तर ? '

' मग त्या गुंडीचा उपयोग काय झाला? अन् दादांची अन् राणीसाहेबांची आठवण ती काय राहिली ? गुंडी रोज वापरून सुद्धा हरवूं न देणं यांतच खरं शहाणपण आहे. '

बापाचें हें म्हणणें लहानग्या भय्याला पटलेंसें दिसलें, तरी पण त्याला आणखी एक शंका आली. तो म्हणाला, ' पण भाऊ! जर पुढे आपल्या घरांत एखाद्याला मुलगाच झाला नाही किंवा होऊन मेला तर मग त्यानं आपल्या म्हातारपणीं या गुंडीचं काय करायचं हो ? '

भय्याची ही शंका मात्र बिनतोड होती व भाऊसाहेबांना तिचं उत्तर नीट देतां आलें नाही. ते म्हणाले, ' मग त्याचं तो ठरवील. '

— ३ —

याही गोष्टीस सहा वर्षे झालीं. भय्या आता चौदा वर्षांचा होऊन इंग्रजी शाळेंत जाऊं लागला होता. भाऊसाहेबांचा तर तो उजवा हात झाला होता. होतकरू, अत्यंत सुस्वभावी, प्रेमळ, दुसऱ्याचे उपयोगी पड-णारा आणि ध्येयवादी मुलगा म्हणून त्याची ख्याती झाली

होती. भाऊसाहेबांना तो त्याच्या गुणांमुळे जीव कीं प्राण वाटे. त्यांच्या कित्येक गोष्टींची व्यवस्था भय्याने स्वत:कडे घेतली होती. त्यांची लायब्ररी नीट लावणें, ते प्रवासाला निघाल्यास त्यांचे कपडे काढून देणें व आल्यावर परत मोजून ठेवणें, त्यांची कामें नोकरांनी नीट केलीं आहेत कीं नाहीत हें पाहणें, इत्यादि सर्व भय्याच करी आणि त्यामुळे भाऊसाहेबांना आपल्या मागची केवढी तरी दगदग टळली असें वाटून हायसें होई. पण या बापलेकांमधील संबंध अधिक जिव्हाळ्याचे होण्यास आणखीहि एक कारण होतें. तें असें की, भाऊसाहेब भय्याला एक लहान पोर म्हणून न वागवतां, एक जिवाभावाचा मित्र म्हणून वागवीत आणि आपल्या सर्व गोष्टींची त्याच्याजवळ खुल्या दिल्याने चर्चा करीत. हरएक बाबतींत त्याचा जरी त्यांनी सल्ला घेतला नाही, तरी अमूक एक कारणासाठी अमूक एक गोष्ट मी करतों, असें ते त्याला सांगत व भय्यालाहि तें पटेच. इतकें की, भाऊसाहेबांचें अमुक चुकलें असे कोणी म्हटलेले त्याला बिलकूल खपावयाचें नाही. त्याने लागलीच बापाने सांगितलेली कारणें, त्यांत स्वत:च्या बुद्धीप्रमाणे आपलीहि आणखी भर घालून लोकांस सांगावीं आणि बापाच्या मुद्द्यांचें जोरदार समर्थन करावें. आपल्या मनांतले भावी बेत, आकांक्षा, भाऊसाहेब अनेकदा भय्याजवळ बोलत व भय्याहि तें सर्व मोठ्या आस्थेने आणि अभिमानाने ऐके. अमुक एक गोष्ट माझ्या हातून झाली नाही, पण ती कधीतरी व्हावी, अशी आपली फार आकांक्षा आहे, असें जर कधी भाऊसाहेब म्हणाले, तर भय्या लागलीच म्हणे, ‘ भाऊ! तुम्ही अगदी

काळजी करूं नका. मला जरा मोठा होऊं द्या, मग पहा मी तें तुम्हाला करून दाखवितों कीं नाही ! ' आणि आपल्या लहानग्या मुलाचे हे उत्साहाचे उद्गार ऐकून भाऊ-साहेबांस अर्थात् मोठें धन्य होई.

पण इतका चांगला मुलगा असण्याची त्यांची पात्रता नव्हती, असेंच देवाला वाटलें असलें पाहिजे. एके दिवशीं सकाळीं भय्याचें डोकें अकस्मात् खूप दुखूं लागलें. संध्या-काळपर्यंत हें डोकें दुखणें नेहमीचेंच असेल अशा समजुतीने त्यावर घरगुती उपचार केले; पण संध्याकाळीं जेव्हा त्याला सपाटून ताप भरला आणि त्याची शुद्धीहि कमी होऊं लागली, तेव्हा मात्र डॉक्टरला ताबडतोब बोलावण्यांत आलें. त्याने निदान करून सांगितलें की, 'हा मेनिन्जायटिस आहे.' मग जे काय ते उपचार पैशाकडे, जिवाकडे न पाहतां करण्यांत आले. परंतु भय्याची बेशुद्धी वाढतच चालली आणि दुसऱ्या दिवशीं दुपारीं तो गोड मुलगा आपल्या प्रेमळ आईबापांचा, स्वतःच्या नश्वर देहाचा, त्याग करून शांतपणें परलोकीं चालता झाला!

— ४ —

भाऊसाहेब आणि अक्का यांच्या दुःखाचें वर्णन न करणेंच बरें. वरकरणीं त्या दोघांनी तो प्रसंग मोठ्या धैर्याने आणि शांतपणाने सहन केला व त्याबद्दल लोकांनी आणि त्यांच्या इष्टमित्रांनी त्यांची प्रशंसाहि केली; पण त्यांचें अंतर्याम कसें जळत होतें, तें इतरांना कळणें

अशक्य. भाऊसाहेबांचें व भय्याचें जीवन, त्यांच्या आकांक्षा इतक्या एकरूप झाल्या होत्या की, त्यांना भय्याचें पदोपदीं स्मरण होऊन, अंतःकरणांतली जखम ताजी होऊन नव्या-प्रमाणे वाहूं लागे. त्यांनी आणि भय्याने मिळून कितीतरी बेत केले होते; भय्याबद्दल, त्याच्या शिक्षणाबद्दल त्यांनी कितीतरी मनोरथ केले होते;आपल्या हातून पुऱ्या न झालेल्या आकांक्षा व ध्येयें भय्याच्या हातून आपण पुरीं करवूं असा त्यांना सकारण विश्वास वाटत होता. बापाने आपली ध्येयें मुलावर लादणें आजच्या शिक्षणशास्त्राच्या दृष्टीने चुकीचें असेल, पण भाऊसाहेबांनी तीं भय्यावर लादलीं नव्हतीं. बापावरील नितांत प्रेमामुळे आणि श्रद्धेमुळे भय्या नकळत त्या ध्येयांशीं समरस झाला होता; आणि म्हणूनच बापलेकांत इतका विलक्षण जिव्हाळा उत्पन्न झाला. भाऊ-साहेब आपल्या मनाला, आपल्या पत्नीसाठी म्हणून, फार जोराचा आवर घालीत; परंतु नित्यशः असा कांहीतरी प्रसंग घडे की, ज्यामुळे भय्याचें व त्याच्या आपल्यावरील निस्सीम प्रेमाचें स्मरण होऊन त्यांचे डोळे डबडबून येत.

लोकांना वाटे की, यांचा एकुलता एक मुलगा गेला, फिरून दुसरें अपत्य होण्याचा संभव नाही, आपल्या इस्टेटीला आपल्यामागे कोणी वारस नाही, याकरिता भाऊसाहेबांना वाईट वाटतें. परंतु इस्टेटीला वारस नसल्याबद्दल त्यांना मुळीच वाईट वाटलें नाही. आपल्या आणि आपल्या पत्नीच्या पश्चात् आपली इस्टेट एका मोठ्या संस्थेस देऊन एक "ग्रामोद्धार-केंद्र" स्थापण्याची योजना आपल्या मृत्युपत्रांत त्यांनी केव्हाच करून ठेवली होती. मुलगा नेऊन आपल्या

मिळकतीचा असा उपयोग करण्याची संधि दिल्याबद्दल ते देवाचे आभारहि मानीत.

**देव भक्तालागी करूं नेदी हा संसार ।**
**अंगें वारावार करोनी ठेवी ॥**

या तुकाराम महाराजांच्या उक्तीप्रमाणे आपल्यावर एक प्रकारची ईश्वराने कृपाच केली, असेंहि ते अंतःकरण-पूर्वक म्हणत.

भय्याच्या पश्चात् दुसरें अपत्य होण्याचा संभव नाही, याबद्दलहि त्यांना वाईट वाटलें नाही. यापुढे दुसरा मुलगा झाला तरी त्याचें संगोपन करून त्याला मोठा करण्याइतके आयुष्य आणि उत्साह आता आपल्याजवळ नाही, मग तो होण्यापेक्षा न झालेलाच बरा; असें त्यांना वाटे. शिवाय यदाकदाचित् झाला आणि तो भय्यासारखा चांगला व प्रेमळ न निघाला तर तो सुखापेक्षा दुःखाला मात्र जास्त कारणीभूत होणार; म्हणून फिरून दुसरें अपत्य होण्याचा संभव नाही हेंच बरे, असाहि विचार त्यांच्या मनांत येई व ते तो आपल्या मित्रांजवळ बोलूनहि दाखवीत. त्यांना भय्याचें वारंवार स्मरण होऊन अपरंपार दुःख होई. पण तें आपला एकुलता एक मुलगा गेला, आपण निपुत्रिक राहणार म्हणून नव्हे. भय्याबरोबर त्याचें निष्पाप प्रेम आणि त्याची अढळ श्रद्धा गेल्यामुळे त्यांना आयुष्यांत चुकल्यासारखें होई; आणि आपलीं सर्व ध्येयें भय्याबरोबर जळून खाक झालीं, तीं फिरून जिवंत होणें अशक्य, म्हणून त्यांचा जीव दुःखाने गुदमरून जाई.

भय्याचें स्मरण प्रत्यहीं करून देऊन त्यांच्या मनाला अत्यंत ताप देणारी दुसरी एक गोष्ट म्हणजे ती हिऱ्याची गुण्डी! भय्याने आपल्याला ही गुण्डी मागितली होती आणि आपल्या वडिलांच्या इच्छेप्रमाणे मी तुला ती माझ्या म्हातारपणीं देईन असें आपण त्याला बोललों होतों, त्याची त्या गुन्डीमुळे भाऊसाहेबांना रोज आठवण होऊन आपल्या हातून ती गुण्डी घेण्यास भय्या आता नाही आणि आपल्या पश्चात् या गुंडीचें काय करावे? या विचारानेच त्यांचें दुःख जास्त दुणावे. भय्या आठ वर्षांचा असतांना त्याचें व आपलें या गुण्डीबद्दल झालेलें संभाषण राहून राहून त्यांच्या मनांत येई, आणि ' आपल्या घरांत एखाद्याला मुलगा होऊन पुढे मेला तर त्यानं म्हातारपणीं या गुडीचें काय करावं हो? ' हा भय्याने अजाणतेपणाने व सहज विचारलेला प्रश्न फिरून त्यांच्या कानांत घुमे. भय्याने तो प्रश्न भावी परिस्थिति ओळखून तर विचारला नसेल ना ? आपण त्याच वेळी त्याला ही गुण्डी दिली असती तर किती बरें झालें असतें ? आपल्या भावी पिढींतल्या प्रत्येक पुरुषाने आपली आठवण म्हणून ही गुण्डी वापरावी, ही आपल्या वडिलांची इच्छा अंशतः तरी पूर्ण झाली असती. पण आपण त्याला गुण्डी त्या वेळीं न दिल्यामुळे ती वापरण्याचा योग न येताच भय्या गेला आणि आपल्या पश्चात् दादासाहेबांच्या इच्छेप्रमाणे ही गुण्डी घेण्यास कोणीच नाही! भाऊसाहेबांचेंहि त्या गुन्डीवर दादासाहेबांइतकेंच प्रेम होतें; त्यांना तिच्याबद्दल तितकाच अभिमान वाटे. म्हणून ती गुण्डी आपल्या घराण्यांत त्यांचें स्मारक म्हणून वंशपरंपरा रहावी, ही आपल्या

वडिलांची इच्छा आता विफल ठरली, हेंहि भाऊसाहेबांच्या दुःखाचें आणखी एक कारण होतें; आणि भय्याचें स्मरण जास्त तीव्रतेने करून देण्यालाहि याप्रमाणे ती गुण्डीच कारण होई. भय्याने जिचा उपयोग केला असता ती लायब्ररी एखाद्या संस्थेस देऊन सत्कारणीं लागेल; तो जिचा मालक झाला असता ती इस्टेट एखाद्या उपयुक्त लोककार्याचा आधार होईल; पण त्याने जी गुण्डी घातली असती, पुढे आपल्या मुलास दिली असती आणि जिच्यामुळे आपल्या कर्तृत्ववान् दादासाहेबांचें एक अल्पसें स्मारक पिढ्यान्पिढ्या घराण्यांत राहिलें असतें, ही गुण्डी! पण छेः, भाऊसाहेबांना तो विचारच असह्य होई आणि ते एकटे असले म्हणजे सहा वर्षांपूर्वीचें भय्याचें व आपलें संभाषण आठवून लहान मुलाप्रमाणे रडूं लागत. ती गुण्डी न वापरतां ठेवून द्यावी, असाहि विचार त्यांच्या मनांत कित्येकदा आला; पण आपण ती नेहमी वापरावी ही दादासाहेबांची इच्छा आपल्याशिवाय पुरी करणारें आता दुसरें कोण आहे ? असा दुसरा विचार लागलीच मनांत येऊन गुण्डी ठेवून देण्याची कल्पना ते दूर सारीत.

— ५ —

एकदा भाऊसाहेब कांही मित्रमंडळीबरोबर आपल्या मळ्यांतल्या विहिरीवर पोहण्यास गेले होते. पोहणें आटोपून ते वर आले आणि वरच्या पायरीवर उभें राहून त्यांनी अंग कोरडें केलें. धुतलेलें धोतर नेसल्यावर अंगांत घालण्यासाठी सदरा उचलून घेतला. तो डोक्यावर धरून

दोन्ही बाह्यांत हात घातले. आता डोक्यावरून सदरा खाली ओढणार, तोंच त्यातून खाली पायरीवर कांहीतरी पडून त्याचा टप्‌दिशीं आवाज झाला. कसला आवाज म्हणून ते पाहतात, तों ती हिऱ्याची गुंडी सैल झालेल्या भोकांतून डोक्याच्या धक्क्याने निसटून पायरीवर आपटून तेथून खाली पाण्यांत पडत होती. त्यांची दृष्टि गेली त्या वेळीं गुंडी पायरीवर उडून पाण्याकडे चालली होती. खाली कांही लोक अद्यापि पोहत होते. त्यांना गुंडी पडते आहे हें लागलीच सांगून जेथल्या तेथे ती धरावी, असा विचार त्यांच्या मनांत आला. पण त्यांना फिरून लागलीच वाटलें, ' कोणासाठी ? जो ही गुंडी पुढे घालणार तो भय्या कुठं आहे ?' पडणाऱ्या गुंडीकडे लोकांचें लक्ष वेधून ती काढण्याचा विचार भाऊसाहेबांनी तावडतोब रद्द केला. पायरीवर उभे राहून त्यांनी ती गुंडी पाण्याच्या पृष्ठभागावर पडून आत जातांना पाहिली. पाण्यावर पडलेल्या स्वच्छ सूर्यप्रकाशामुळे हळूहळू तळाशीं जातांना ती गुंडी कितीतरी वेळ दिसत होती आणि ती जों जों खाली गेली तों तों भाऊसाहेबांच्या मनावरील एक मोठें दडपणहि कमी कमी होत गेलें. भय्याचा सुकुमार देह हळूहळू चितेवर नष्ट होतांना त्यांनी जितक्या शांतपणें पाहिला, तितक्याच शांतपणाने त्यांनी ती हिऱ्याची सुन्दर गुण्डीहि हळूहळू पाण्याच्या तळाशी जात असतांना पाहिली !

खालून कोणी विचारलें, ' काय भाऊसाहेब ! काय पाहाता ? '

समाधानाचा एक दीर्घ निःश्वास टाकून भाऊसाहेबांनी उत्तर दिलें, ' कांही नाही ! '

— ६ —

त्या दिवशीं घरीं आल्यावर जेवतांना गळयाची गुण्डी नसलेल्या भाऊसाहेबांच्या सदऱ्याकडे लक्ष जाऊन अक्कासाहेबांनी विचारलें, ' गळयाची गुण्डी काय झाली आज ? कुठ विसरली वाटत ? '

'नाही; विहिरीवर सदरा घालतांना निसटून पाण्यांत पडली. '

अगबाई ! हिऱ्याची किंमतीची गुण्डी आहे ती. मग पांडूला सांगितलं का काढायला ? पडलेली नक्की जागा समजल्यावर बुडी मारून काढून शाणील तो.'

भाऊसाहेबांचा कंठ सद्गदित झाला होता आणि त्यांचे डोळेहि पाण्याने भरून आले होते; पण पत्नीच्या लक्षांत तें येऊं नये म्हणून प्रयत्नाने त्यानी मन आवरलें आणि तोंडावर कृत्रिम हास्य आणून ते म्हणालें, नको ती काढायला. तिचा आता कांही उपयोग नाही ! '

तोंडांतला घास कसाबसा गिळून भाऊसाहेबांनी वर पाहिलें; तों त्यांचें वाक्य ऐकून अक्कासाहेबांचेहि डोळे त्यांच्याप्रमाणेच पाण्याने भरून आले होते ! !



# पैजेचें भांडण

( लेखक– श्री० **ना० धों० ताम्हनकर.** )

कोणी कितीही निर्वाळा देऊन सांगितलें की, 'आताशा गणूकाका आणि सरूकाकू यांची खडाजंगी उडत नाही,' तरी त्यावर माझा विश्वास बसणें शक्य नाही. एखाद्या संस्थानिकाने सारावाढ कधीही न करण्याची शपथ घेतली, किंवा एखादा तरुण कॉलेजांत शिकत असूनहि तपकीर ओढत नाही, असें कोणी सांगितल्यास मीं तें खरें मानीन. एकुलत्या एका मुलाच्या लग्नांत श्रीमंत बापाने एक पैसाहि हुंडा घेतला नाही, असें सांगणाऱ्यावरहि विश्वास ठेवण्यास तयार होईन; पण गणूकाका आणि सरूकाकू साऱ्या दिवसांत एकदाहि भांडलीं नाहीत, ही गोष्ट मी स्वप्नांतहि खरी मानावयाचा नाहीं, मग जागेपणची गोष्टच कशाला ?

यावरून मी या दंपतीची बदनामी करतों, असें समजण्याचें मुळीच कारण नाही. भांडणाची एक गोष्ट वगळली तर त्यांच्या ठिकाणीं असे कित्येक सद्गुण आहेत की, त्यांचा आपण कित्ता घ्यावा.

‘ उद्योगी, कल्पक, विनोदी व मध्यानरात्रीहि दुसऱ्याच्या मदतीला तयार असणारे ’ असा गणूकाकांचा लौकिक आहे आणि तो खरा आहे. सरूकाकू जरी शिकलेल्या नाहीत, तरी संसार टुकीने कसा करावा, हें त्या जाणतात. शेजारपाजारणींच्या अडीअडचणींत हातभार लावायला सरूकाकूंचा पाय नेहमी पुढे. पाकशास्त्रांत तर त्यांच्यासारखी सुग्रण आमच्या साऱ्या आळींत नाही, असें आमची ‘ही’ वरचेवर सांगत असते.

दोघेहि सालस आणि गोड स्वभावाचीं असून या नवराबायकोचें एकसारखे खटके कसे उडतात, असें आम्हां सर्वांना मोठें गूढ पडे. पण ज्या अर्थी त्या भांडणांत वैमनस्य आणि द्वेष यांचा कडवटपणा जराहि नव्हता, त्या अर्थी आम्हांला त्यांच्या भांडणाचा विषाद वाटण्याऐवजीं मौजच वाटत होती. त्यांचें भांडण म्हणजे एक प्रकारचा प्रेम-कलह असे आणि तो अकारण घडून येई.

‘ अकारण ’ हा शब्द जरी मी बेलाशक दडपून दिला, तरी कारणावाचून कार्य घडत नाही, हा सृष्टीचा कायदा मला माहीत आहे. गणूकाकांचें व सरूकाकूंचें भांडण जुंपण्यासहि कांही तरी कारण घडावेंच लागणार आणि तें घडतेंहि; पण तें इतकें क्षुल्लक असतें की, त्याला ‘ कारण ’ हें नांव देण्यास कोणीहि तयार होणार

नाही. 'महाबळेश्वराची हवा उन्हाळयात गार असते ' असें गणूकाकांनी म्हटलें की ' महाबळेश्वराची कशाला हवी प्रतिष्ठा ? आमच्या परसांतल्या चिंचेखाली सुद्धा कसं गारीगार असतं ' असा सरूकाकूंनी शेरा मारलाच ! उलट पक्षीं ' बय्यींची बनी कशी नक्षत्रासारखी पोर आहे ' असें सरू काकूंनी वर्णन केलें की ' आहे ठाऊक? आमच्या बया मोलकरणीची बाळीहि तिच्याहून सुंदर आहे ' असा जबाब गणूकाकांनी दिलाच म्हणून समजावें. प्रारंभीं गमतीदार भासणाऱ्या या शब्दांच्या ठिणग्या लवकरच उग्र स्वरूप धारण करीत आणि भांडणाचा खटका उडून जाई.

या भांडणाचा आणखी एक विशेष होता व तो म्हणजे त्याचा निकाल कधीच लागावयाचा नाही. दोघांपैकी कोणी तरी एक जण दृष्टीआड झालें की भांडणहि परागंदा होई. पुनर्भेटीच्या वेळी मागील भांडणाची आठवण दोघांपैकी एकालाही होत नसे आणि दोघेहि अभिजात प्रेमाने एक-मेकांशी हसली खेळलेलीं दिसत!

माझें हें भारूड ऐकून अशा गमतीदार जोडप्याच्या भांडणाचा मासला आपल्यासहि अनुभवावयास सापडावा अशी उत्कंठा तुम्हाला खचीत लागली असेल आणि स्थलदूरत्वामुळे ती गोष्ट शक्य नाही असे तुम्हाला वाटून तुम्ही मनांतून खट्टू झाला असाल. तुमच्या मनाची ही अवस्था मला कळली आहे आणि म्हणूनच मी माझ्या अनेक अनुभवांपैकी एक अनुभव तुम्हाला सांगावयाचें ठरविलें आहे. प्रत्यक्षाची गोडी या सांगावांगींत येणार नाही हें खरें; पण 'दुधाची तहान ताकावर' भागविणेस काय हरकत आहे?

कालच पगार झाला होता आणि आज रविवार होता. असा योग जमून आल्यावर लुगडें घेऊन येण्याचें टुमणें आमच्या हिने लावलें तर आश्चर्य कसलें ? उडवाउडवी करण्याचा एकदा दोनदा मी हलकासा प्रयत्न केला; पण घरांतील भांड्यांच्या आदळआपटीवरून आणि चिंगीच्या पाठीत सुखासुखी बसलेल्या रपाट्यावरून प्रकरण घाईला आल्याचें मी अनुमान बांधलें आणि कोट–टोपी चढवून बाजाराचा रस्ता सुधारला.

आपल्या समजुतीने आणि अक्कलहुषारीने आपण कितीहि छानदार सणंग पसंत केलें तरी तें 'घरी' हमखास नापसंत होण्याचा संप्रदाय मला माहीत आहे. हत्तिणीच्या सोंडेंत दिलेली राजकन्येची स्वयंवरमाला भिकभटाच्या गळ्यांत पडल्यावर आपल्याला जितकें आश्चर्य वाटेल, तितकेंच आश्चर्य नेलेलें लुगडें पहिल्याच सटक्यास बायकोला पसंत पडून कृतार्थ झालेल्या नवऱ्याचें मला तरी वाटेल. दुकान आणि घर यांतील अनेक हेलपाट्याचें श्रम वाचविण्यासाठी मी लिलू शेटजींच्या दुकानांतील निरनिराळ्या दहाबारा सणगांचा गठ्ठा त्यांच्याच गड्याच्या हातीं देऊन घरीं नेला आणि हिच्यापुढे तो उघडा केला. गगरुसव्याचा संपर्क सात जन्मांतहि झाला नाही, इतकी इची कळी खुलली. एकेक सणंग उलगडून पाहतांना तो देहभानहि विसरून गेली. कारण ' आई! तुझ्या अंगावर झुरळ चढला बघ ' असें चिंगी ओरओरडत सांगत असूनहि तें तिच्या ध्यानीं नव्हतें. कांही वेळ तिला निरीक्षण करूं दिल्यावर मी तिला विचारलें, ' मग कोणतें पसंत?'

ती उत्तर देणार होती; पण मधेच ' कायरें हें ? कसलं दुकान मांडलं आहेस? '

असा गणूकाकांचा प्रश्न माझ्या कानावर आला. पण मी त्याचें उत्तर देण्याच्या आधी तेच म्हणाले, ' लुगडीं घ्यायचीं आहेत वाटतं राणीसाहेबांना ? भारी लकडा बुवा या बायकांचा! आमची सुद्धा किती दिवस लुगडं लुगडं करती आहे. '

' मग होऊं दे यातच—कामांत काम होईल आणि तुमचा हेलपाटा वाचेल. '

पण तिची ही सूचना काकांनी ऐकली कीं नाही कोण जाणे! आकडे तुटल्यामुळे पाकिटाच्या दोऱ्याने सजविलेला चष्मा कानाडोळ्यावर फिट करण्याच्या ते दगदगीत असलेले दिसले. त्यांतून मुक्त झाल्यावर त्यांनी विडी शिलगावली आणि टेबलावरील 'नवा काळ' घेऊन ते गांधी—नेहरूंच्या समाचारास लागले.

काकांच्या बोलण्यावरून आमच्या 'हिला' सरूकाकूंचें स्मरण झालें. लुगडें निवडण्याचे वेळीं सरूकाकूसारख्या अनुभवी व पोक्त स्त्रीचा सल्ला फुकटावारी मिळण्याची शक्यता असतांना हिने तो कां दडवावा ? त्यांत स्वत:साठी लुगडें घेण्याची संधी सरूकाकूंना आपण मिळवून दिली असाहि दिमाख तिला दाखवावयाचा नसेल तरी कशावरून ?

सरूकाकू आल्या. त्यांना बोलावण्याचा हेतु आधीच कळलेला असल्याने आल्यावरोबर त्यांनी पसरलेल्या सणंगांवर

झेप घेतली. उत्सुकतेच्या भरांत गणूकाका तेथे आहेत, या गोष्टीकडे त्यांचें लक्षहि गेलें नाही. पदर, काठ, वाण, खवले, रास्ता, धनवडी, इरकल, नारायण पेठ, गजानन, सरस्वती, व्यंकटेश रंगतंतू इत्यादि लुगड्यांचे संबंधी किती तरी शब्द त्या दोघींच्या बोलण्यांत मला ऐकूं आले. अखेर त्यांचा बेत नक्की झाला आणि एक घडी माझ्या पुढे धरून 'ती' म्हणाली, ' हें घ्यायच! '

' पण, त्याला २० रु. पडतात. ' मी घाबरून म्हणालों.

' मग काय झालं पडले म्हणून ? लगीन झाल्यापासून एकदा तरी घेतलंय का मनासारखं लुगडं ? मेला सुताड्यांत जन्म चालला आहे. घ्यायचं नव्हतं एवढं मोठं तर दाखवायला तरी आणलं कशाला ? ' लाडिवाळपणा आणि घुस्सा यांचें मिश्रण त्या तिच्या शब्दांत मला स्पष्ट दिसून आलें.

' पण रोजच्या राबत्यांत असलं भारी काय कामाचं ? ठेवणीचं म्हणून घ्यायचं असतं तर गोष्ट वेगळी. '

' ठेवणीसाठीच घ्यायला सांगते, मी झाल्ं तरी. बासनांत एक सुद्धा झुळझुळीत लुगडं नाही. कुठं जायसवरायचं झालं तर असल्या गोधड्या नेसून का जायचं? रोज वापरायला सुताडा घ्या नाही तर पातळ घ्या— मी कुठं म्हणतें त्याबद्दल? '

' हुंऽऽ? ' असा लुगड्याइतका लांबरुंद अघळपघळ उद्‌गार काढण्यावाचून दुसरें काय बोलणें मला शक्य होतें? मी नुसता अस्वस्थ मनाने तिच्याकडे पहात राहिलों.

माझी ही अवस्था सरूकाकूंच्या लक्षांत आली आणि पोक्त-पणाचा मोठाच आव आणून त्या म्हणाल्या–

'आहे तिच्या मनांत तर टाकीनास घेऊन? त्या सुंदरा-बाईनं नाही का घेतलं परवा पंचविसात्रं? ती काय तशी तालेवार लागून गेली आहे?'

अजूनहि मला काय उत्तर द्यावें, हें सुचत नव्हतें. पण दया देवाला आली आणि गणूकाकांच्या रूपाने तो मला पावला. गांधी–नेहरूंचा समाचार त्यांना पुरता कळला होता की नाही राम जाणें–पण काकांनी 'नवा काळ' बाजूला सारला, चष्मा नाकावरून उतरला, उरलेलें थोटूक पुनः शिलगावलें आणि पत्नीवर रोख धरून ते गरजले, 'काय झालं सुद्राबाईला तालेवार नसायला? नवरा मामलेदाराचा फडणीस, त्याची सर या शाळोपंताला कशाला?'

'शाळोपंत' या निंदाव्यंजक शब्दाने मला एरव्ही राग आला असता व तो उच्चारणाऱ्यावर मी चांगलाच तुटून पडलों असतों. पण गणूकाकासारख्या पाठिराख्याने केवळ माझा कैवार घेऊन ती पदवी बहाल केली असल्याने मला त्या वेळीं हायसें वाटलें आणि पतिराजांच्या या मुद्द्यावर सरूकाकू काय कोटिक्रम करतात इकडे मी लक्षपूर्वक कान दिला.

'तुमचं राहूं दे. तुम्हाला सदाच निरशी भरलेली. बाबू-राव शाळोपंत असला तरी त्याला हौस आहे. आपल्या बायकोचे लाड तो खचीत पुरवील. तुमच्यासारखा नुसता छळवाद नाही करावयाचा!'

' माझ्या छळवादानंच तूं इतकी रोडत चालली आहेस! दारं रुंद करायला गडी-सुतार केव्हा बोलवावे, या विचारांतच मी आहें. '

' आणि तुम्ही वाळून चिपाड झालांय् जसे ! लोकांला नांव ठेवायला पहिला नंबर. कुणी पोट बघितलं तर गणोबा म्हणून पाया पडतील. '

भांडणाच्या भरांत आपण आपल्या नवऱ्याचें नांव घेतलें, हें सरूकाकूंच्या मुळीच लक्षांत आलें नाही. मी मात्र त्यांच्या या उपमेने हसलों आणि तिलाहि हसूं आल्यावाचून राहिलें नाही. ती हसतच काकूंना म्हणाली, ' इश्श, काकू ! काय बोलतां हें तुम्ही ? '

' तूं गप्प बस ग. यांना असंच गप्प बसविलं पाहिजे. मी गप्प बसतें म्हणून हे मला जेव्हा तेव्हा घालून पाडून बोलत असतात. यांना किनई, त्या जनूभाऊ जोश्याची संगत बाधली आहे. तो मेला त्या बिचाऱ्या जानकीबाईला राक्षसासारखा छळत असतो. परवा किनई ती बिचारी मला नदीवर भेटली आणि माझ्या गळ्याला पडून रडायला कि ग लागली– '

पंचतंत्रांत किंवा अरेबियन नाईट्स्मध्ये एका गोष्टींतून दुसरी गोष्ट उत्पन्न व्हावी, त्याप्रमाणे सरूकाकूंच्या भाषणांत एका दाखल्यांतून दुसरा दाखला पैदा होऊं लागला. गणूकाका मधून मधून एखाद्याच लागट शब्दाची चावी देत आणि सरूकाकूंची प्लेट फिरून नव्या अवसानाने फिरूं लागे. त्या दिवशीं बसल्या बैठकीला मला गावांतील अशीं कितीतरी

कुलंगडीं समजलीं की जीं मला माहीत नव्हतीं आणि माहीत होणें शक्यहि नव्हतें. जनूभाऊ जोशी जानकीबाईंना राक्षसासारखे छळतात, भगवंतराव भावे बायकोच्या तोंडावर विडीचा धूर सोडतो, शामराव बायकोला कथेला सुद्धा जाऊ देत नाही आणि चिंतोपंत चिकणे बायकोला उपाशी ठेवीत असल्यामुळे ती शेजारच्या रामभट रानडयाच्या घरीं चोरून थालीपीठ लावून खाते, अशा अनेक आख्यानांनी माझें कान पुनीत झाले.

हें वाग्युद्ध कोठून सुरू झालें, याचें भान सरूकाकूंना राहिलें नसलें तरी त्यांचें गणूकाकांवर घसरण्याचें धोरण शाबूत होतें! दरएक उदाहरणाचा संबंध त्या येन केन प्रकारेण यजमानाशीं जोडीत आणि मग दुसऱ्या उदाहरणाचें सूतोवाच करीत. खाष्ट नवऱ्यांच्या गोष्टींबरोबर त्यांनी बायकोच्या मुठींत असलेल्या नवऱ्यांच्याहि गोष्टी सांगितल्या. भोळाराम भागवत आपल्या बायकोचीं लुगडी धुतो, एवढेंच नव्हे तर एके दिवशीं तो तिच्या हौसेखातर लुगडें नेसून तिच्याबरोबर फुगडीहि घालूं लागला, हें सरूकाकूंनी दिलेलें उदाहरण ऐकून आम्हां श्रोतृवर्गात हशाच पिकला. काकूंचीं खुमासदार आख्यानें खलास होऊन जेव्हा त्या भोळारामा-सारखीं आचरट उदाहरणें उकरून काढूं लागल्या, तेव्हा मला कसें तरी करून हें भारूड बंद करावें, असें वाटूं लागलें व मी म्हटलें—

'काकू! भांडणाचा तुम्हाला कंटाळा कसा येत नाही? न भांडतां एक दिवस तरी राहून दाखवाल का?'

आपण यजमानांबरोबर क्षणापूर्वी भांडत होतों, ही गोष्ट अजीबात विसरून काकू माझ्यावर उलटून म्हणाल्या, ‘ काय बक्षीस देणार आहेस कीं काय ? ’

‘ हो हो, तुम्ही जर एक दिवसभर उजाडल्यापासून दिवस बुडेपर्यंत काकांच्याबरोबर न भांडतां रहाल, तर मीं पांच रुपये देईन तुम्हांला. होऊन जाऊं दे हवं तर आजच. आज सुटी आहे, येतों तुमच्यावर पहारा करायला. ’

‘ बघ हं, पैज हुकशील ? ’

‘ त्याची नको भीती तुला बाबुराव ? ’ काकांनी मध्येच फुसकुली सोडली.

‘ तुम्ही गप्प बसा. बघून घेतें मी या वात्रटाचं ’ असें म्हणून त्यांनी मला सवाल घातला ‘ विचार करून मारतो आहेस ना पैज ? अजून मागं घे. ’

‘ मी मुळीच मागं घेत नाही. तुम्ही जपून रहा म्हणजे झालं. तुम्ही हरलां तर उलट पांच रुपये द्यावे लागतील. शिवाय माझं आजचं जेवण वर. मी पहारा करायला येणार तो उपाशीच राहूं वाटतं ? ’

माझी ही थट्टेतली पैज आणि थट्टेतली आगंतुकी खरीच ठरली! त्यांनी मला तर जेवायला बोलावलेंच, पण आमच्या हिलाहि आमंत्रण दिलें. काकांनी ‘ म्हणजे ? ’ या शब्दाने आपलें आश्चर्य प्रगट केलें आणि ‘ म्हणजे काय ? माझं रुषिपंचमीचं दंपत्य सांगायचं आहे. ’ या शब्दांनी काकूंनी त्यांना गप्प बसविलें. लवकर येण्याबद्दल तिला आणि पैजेचे

पांच रुपये घेऊन येण्याबद्दल मला बजावून काकू घरीं गेल्या. काकाहि मग फार वेळ बसले नाहीत.

'राव ! तुम्ही आज तूपपोळीची सोय लावलीत; पण आमच्या शेटजींची काय वाट ?' असा टोमणा लिलू-शेटच्या गड्याने मारला.

बारा रुपयांचें एक बऱ्यापैकी लुगडें ठेवून घेऊन मी त्याला निरोप दिला. ही जरा कुरकुरली, पण 'घेऊं सवडी-सवडीनं' एवढ्या आश्वासनानें तिचेंहि समाधान झालें. 'एवढ्यातेवढ्यासाठी भांडण करायला तू सरूकाकू थोडीच आहेस ?' या माझ्या विनोदास 'भांडणाच्या सुरुंगाला बत्ती देणारे गणूकाका तरी इकडं कुठं असायचं ?' असा प्रति-विनोद करून ती अंग धुण्यास चालती झाली.

❀ ❀ ❀

वेळ थोडा असूनहि काकूंनी जेवण्याचा थाट छानदार केला होता. जेवण विनभांडण पार पडलें, हें पाहून मी पैज हरणार कीं काय, अशी धाकधूक मला वाटूं लागली. मी पैज हरल्यास काकू पांच रुपये माझ्याकडून वसूल करतीलच, अशी जरी खात्री नव्हती, तरी काकूसारख्या स्त्रीने 'हरलास कीं नाही' म्हणून हिणवावें ही गोष्ट मला नामुष्कीची वाटत होती. ज्यायोगें हमखास भांडण जुंपेल असे कांही सूचक प्रश्न मी आधूनमधून विचारीत होतों व माझा हेतु सफल होण्याजोगे सूर काकाहि काढीत होते; पण आज काकू तिकडे लक्षच नसल्याचें दाखवीत होत्या. एक वेळेला मात्र काकांच्या शब्दाला त्यांनी प्रतिशब्द ठेवून दिला आणि

'आता आपली फत्ते होणार' या कल्पनेने मला हसूं आलें. यासरशी काकू एकदम भानावर आल्या व म्हणाल्या, ' मी फसेन असं वाटलं होय ? माझ्यासारखी हिय्येबाज बायको नाही तर नाहीच हार जायची. तुझ्यासारखीं कालचीं पोरं मीं पांचशे पाहिलीं आहेत. '

काकू हिय्येबाज खऱ्याच ! त्या खरोखरच भांडल्या नाहीत.

माझी मुख्य मदार भोजनप्रसंगावर, पण तोच विना-भांडण पार पडलेला पाहून मी थोडासा विरसलों. 'आपण आज पैज जिकली' अशा विजयी दृष्टीने मजकडे पाहून काकू गालांतल्या गालांत हसल्या. त्याने तर मी फारच खजील झालों

माझी फजीती होणार हें ठरल्यासारखेंच झालें; कारण आता संध्याकाळपर्यंत गणूकाकांची व सरूकाकूंची गाठ पडण्याजोगें कांहींच कारण नव्हतें आणि गाठच नाही पडली तर भांडण तरी होणार कसें ? एकदा वाटे की, काकूंना सपशेल शरणचिठी देऊन घरचा रस्ता सुधारावा, तर एकदा वाटे बसावें दम धरून. काय नेम सांगावा? काका-काकूची मुलाखत होईल आणि दिवे लागणीच्या आंत त्यांचा एकदा तरी खटका उडेल.

सहाचा सुमार आला. अर्ध्या तासांत दिवे लागणार. मी काकाच्या बरोबर बोलत सोप्यावर बसलों होतों आपला विजय प्रतिपक्षाच्या म्हणजे माझ्या तोंडून वदवून घ्यावा, या इराद्याने काकू तेथे आल्या आणि म्हणाल्या, ' कां बाबुराव!

किती वाजले ? '

' आले सहा वाजायला. अजून दिवेलावणीला अर्धा तास तरी अवकाश आहे. ' काकूंच्या विचारण्याचा रोख ओळखून मी म्हणालों.

' अर्धा तासच ना ? दहा तास जिनं काढले ती अर्ध्या तासाला डरते थोडीच ? फजीती रे फजीती झाली एका माणसाची ! ' काकूंच्या हास्याइतकाच माझा खजीलपणा मोठा असल्याने मी दोहोंबद्दलहि बोलूं इच्छीत नाहीं.

शंभरांपैकी पावणेशंभर हिश्शाने ही गोष्ट खरी ठरल्यासारखी झाली की, काकूंनी विजय व मी पराजय संपादन केला. झक्पक् पोषाख करून डौलाने मिरवायला बाहेर पडावें आणि हमरस्त्यावर पाय घसरून खाली सुबकावें, अशी माझी अवस्था झाली. काकूंच्या पुढे पराजय कबूल करून मोकळें व्हावें, या इराद्याने वर मान करून तोंड उघडण्याचा प्रयत्न करूं लागलों. काकू विजयी मुद्रेने हसतच होत्या. काका तक्क्याला रेलून धुराचे फवारे सोडण्यांत गर्क दिसत होते. ' हें पहा काकू ! ' असें म्हणून मी माझी शरण–चिठ्ठी वदूं लागणार, इतक्यांत काकांच्या अंगांत कसला संचार झाला कुणाला ठाऊक ! ते एकदम म्हणाले, 'बाबू! आचरटाच्या बरोबर शहाण्याने आचरट होण्यांत अर्थ नाही. चल, आपण जरा फिरून येऊं.'

काकूसारखी मानी बायको आणि त्यांत विजयामुळें फुशारलेली बायको, पतीचा हा टोमणा कसा सहन करणार? त्या खवळून म्हणाल्या. ' मध्ये तोंड घालायची भारी खोड.'

'पण मी तुला बोललों का अक्षर तरी ?'

'मीहि अक्षर म्हटलं कां तुम्हांला ? तुम्ही कशाला घेतां आपल्याला चिकटवून ! खाई त्याच्या मनांत खवखवे.'

'दुपारपासून भांडायला मिळालं नाही म्हणून खुमखुमी आलेली दिसतेय्. बाबू ! तूं रोज पैज लावीत जा इच्याबरोबर. मग तरी भांडल्याशिवाय राहते का बघूं. तूं हरलास तर पैजेचे पैसे देत जाईन तुला.'

'मोठे धर्मराजाचे अवतारच की नाही? तुम्ही भांडतां कीं मी? बाबूराव! माझ्याबरोबर पैज मारण्याच्या आधी तूं यांच्याबरोबर पैज मार. तूं हरलास तर मी पैसे देत जाईन तुला.'

'मोठी कुबेराची लेक कीं नाही !'

'माझा बाप कुबेर असेल नाही तर कंगाल असेल. तुमच्याकडे नाही ना आला भीक मागायला? आणि तुमची श्रीमंती ऊतूंच चालली आहे जशी कांही! मग चिमीच्या गर्भदानांत जावईबुवांना पंचवीस रुपये देतांना डोळे पांढरे व्हायची पाळी कशाला आली?'

कडेलोट झालेल्या अभागी प्राण्यास एखाद्या देवदूताने मधल्या मधेच झेलून धरावें तशी ही माझी तऱ्हा नव्हे का? भांडणाऱ्या पैजेंत मी हरलों, असा कबुलीजबाब द्यायला मी तयार झालों, नव्हे त्याची प्रस्तावना करायला मी सुरवातहि केली.

पण ती माझी दुर्दशा तेवढ्यावरच थांबून विजयश्री माझ्या गळ्यांत माळ घालण्यासाठी मंद मंद पावलें टाकीत येऊं लागलेली पाहून हर्ष व आश्चर्य यांचा माझ्या मनांत उदय

झाल्यास नवल कसचें ? त्या सुखदायक विचारांच्या गोड तंद्रींत मी नसतों तर काकाकाकूंच्या उखाळ्या पाखळ्यांत उमटलेल्या एकूण एक गोष्टींचें टिप्पण मी तुम्हांस सादर केलें असतें. तरी पण स्मरणांत आहे तेवढ्याच गोष्टी सांगितल्या तरी तुमची बरीच करमणूक झाल्याखेरीज राहणार नाही.

जावयाची हौस करतांना काका कंजूषपणा करतात, पण सुनेच्या बापाकडून मारवाड्याच्या चिकाटीने ( काकूंच्या मतें ) पैसा उकळतात; जन्माच्या कर्मी त्यांनी सारें चारदांच ब्राम्हणभोजन घातलें; हिंगण्याच्या अनाथ-बालिकाश्रमाला मात्र त्यांनी निष्कारण २०० रुपये दिले; आपला (काकूंचा) दादा आला तेव्हा त्याला आणावयाला ते स्टेशनवर सुद्धा गेले नाहीत आणि लोकांच्या घरच्या प्रेत-यात्रेला ते अगदी धावून जातात; ते स्वतःला अल्पाकचा कोट शिवीत नाहीत; नेहमी जाडींभरडीं कापडेंच वापरतात; चहासुद्धा पीत नाहीत, नमस्कार घालतात व जेवतांना आमटी घमेलीभर खातात, भुरके मोठ्याने वाजवतात, असे एक ना दोन, काकांचे शेकडो दुर्गुण त्यांनी बाहेर काढले. काका इतके ऐसपैस जरी वाहवले नाहीत तरी 'तू चिमोच्या घरीं चोरून फराळाचं धाडतेस, हरतालिकेच्या उपासाला पन्नास केळ्यांखेरीज तुझं भागत नाही व तूं एके दिवशीं म्हशीला गोग्रास चारलास' इत्यादि अहेर अर्पण केल्यावाचून त्यांनी सोडलें नाही. शेवटीं तर 'तुझ्यासारखी भांडकुदळ बायको उत्पन्न करायला ब्रह्मदेवाला निराळा अवतार घ्यावा लागला असेल' असेंहि ते बोलून गेले.

त्यासरशी 'तुम्ही काय वितंडवादी कमी आहांत?' असें

म्हणून काकू पुढे कडकणार तोंच माझ्या हशाच्या स्फोटानें त्या दबल्या. मला हसूं अनावर झालेलें पाहून त्या म्हणाल्या, 'भांडण लावून बघायला तुझं काय जातंय्? पण मी कांही हरायची नाहीं समजलास?'

'मग? आतापर्यंत झालेलं हें भांडण नव्हेच कीं काय? माझ्या या सवालाने काकू भानावर आल्या. वाग्युद्धांत तद्रूप झालेल्या असल्यामुळे आपण आपल्या पैजेला हुकत आहों, ही जाणीवही त्यांना राहिली नव्हती. जी बोलाचाली आपण हा वेळपर्यंत चालविली होती, तिलाच लोक भांडण म्हणतात असा त्यांना उमज पडूं लागला. जें भांडण न करण्याबद्दल आपण पैज मारली होती व जी पैज आपण अगदी शेवटच्या घटकेपर्यंत जिंकलीहि होती ती अशी हातो-हात गमावलेली पाहून त्या नरमल्यावाचून कशा राहतील ?

'मग काय काकू ! अजून दिवे लागायचे आहेत आणि त्याच्या आंत हा तुमचा खटका उडाला आहे. तुम्ही भांडणा-साठी पैज मारली आणि या पैजेच्या भांडणांत माझी सरशी झाली, होय कीं नाही ? आता कांही मी तुम्हाला पांच रुपये द्यायला बांधलेला नाही.'

माझ्या या बोलण्यावर काकूंनी पाऊण वर्तुळाचा एक वळसा मानेला दिला आणि म्हटलें, 'कुणाला हव्या आहेत तुझ्या पांच रुपड्या? पांच रुपयाचा धूप जाळतो माझ्यापुढं.'

'तुळजापूरची भवानीच तूं!'

हा काकांचा टोमणा ऐकायला काकू कुठे होत्या जाग्या-वर ? त्या केव्हाच आंत चालत्या झाल्या होत्या !

# जगाचा न्याय !

( लेखक— श्रीयुत **वासुदेव धोंडदेव गुर्जर.** )

“ उद्या सकाळीं सुटका होणार! ” या सुखद कल्पनेनेच यशवंताच्या अस्थिपंजर झालेल्या शरिरावर क्षणोक्षणीं हर्षरोमांच उभे रहात होते. तीन वर्षांच्या कठोर सपरिश्रम कारागृहवासाच्या सुटकेनंतर होणाऱ्या आनंदाची कोणत्या प्रकारच्या आनंदाशीं तुलना करतां येणार? संध्याकाळीं पांच वाजतां शाळेंतून सुटणारा विद्यार्थी, ऑफिसांतून सहा वाजतां ‘ हुश्श ’ करीत बाहेर पडणारा खर्डेघाशा कारकून किंवा ‘ कजाग ’ सासूच्या हाताखाली ( किंवा पायाखाली! ) वर्ष दोन वर्षें संसार केल्यानंतर माहेरीं जाणारी सून, यांनाच कैद्याला तुरुंगांतून सुटतांना होणाऱ्या आनंदाची कल्पना—साधारण कल्पना—करतां येईल.

आज तीन वर्षें यशवंत ज्या प्रसंगाची आतुरतेने मार्ग-प्रतिक्षा करीत होता, तो आता ' उद्या ' वर येऊन ठेपला होता. आजची दीर्घ रात्र केव्हा संपते व केव्हा एकदाचा मी मोकळा होतों, असें त्याला झालें होतें व तें साहजिकहि होतें. गेलीं तीन वर्षें त्याने जे असहनीय कष्ट सहन केले, ज्या यातना भोगल्या, जे अपमान हृदयांतल्या हृदयांत निरुपायाने दाबून टाकले, त्या सर्वांतून त्याची उद्या सुटका होणार होती; मग असें कां न व्हावें?

यशवंताचा जन्म एका कुलीन पण कालपरिस्थितीने व सावकारी पाशाने कंगाल झालेल्या एका मराठा कुळांत झाला होता. वाईट संगत व त्यांतच शिक्षणाचा अभाव! तो लहानसहान चोऱ्या करूं लागला व त्या जसजशा पचूं लागल्या, तसतसा त्याचा तोच क्रम सुरू झाला व अखेर व्हायचा तोच परिमाम आला. एका घरफोडीच्या चोरींत तो सापडला व त्याला तीन वर्षांची सक्तीची विश्रांती घेणें भाग पडलें!

तसें पाहिलें तर स्वभावाचा तो अत्यंत सालस होता; पण परिस्थितीने मनुष्याची घडण होते व तशीच ती त्याचीहि झाली. त्याच्या ' गुणा ' मुळे त्याला घरांतून हाकून देण्यांत आलें व अन्य व्यवसाय नसल्यामुळे ' चोरी करणें ' हाच त्याचा पोटाचा व्यवसाय झाला. आपण करतों हें वाईट आहे, हें त्याला समजत होतें; पण उमजत मात्र नव्हतें. शिवाय अशा वेळीं आपुलकीच्या भावनेने सावरून घेणारें कोणी वडीलधारें माणसहि नसल्याने तो आजच्या स्थितींत—तुरुंगाच्या चार भिंतींत—येऊन पडला होता!

पण आता मात्र त्यानें आपल्या मनांत नक्की ठरविलें होतें की, आता सुटका झाल्यानंतर पुनः चोरी करावयाची नाही! त्याचा पूर्वस्वभाव जागृत झाला होता म्हणा किंवा तेथील परिस्थितीने त्याचें पूर्णपणें परिवर्तन केलें होतें असें म्हणावें वाटल्यास; परंतु त्याचा असा दृढ निश्चय झाला होता खरा. रोज तो या निश्चयाचें मनन करीत होता व म्हणूनच त्याला ' सुटका होणार ' म्हणून अतिशय आनंद वाटत होता. बाहेरच्या जगांत गेल्यानंतर श्रीमंतांच्या घरीं आपण इमानेंइतबारें नोकरी करूं व निढळाच्या घामाने मिळविलेलें अन्न खाऊन पुढील आयुष्य चांगल्या प्रकारें घालवूं, अशी त्याची आकांक्षा होती; त्यामुळे भविष्यकाळ अत्यंत सुखकर व उज्ज्वल असा त्याला दिसत होता. मधून मधून भूतकालचीं स्वतःच्या दुष्कृत्यांचीं भुतें त्याला भेडसावीत होतीं; पण त्यांना तो आता जुमानीत नव्हता ! चांगल्या रीतीने वागून संसार करावयाचा, असा त्याचा निश्चय ठरला होता–तेंच त्याचें ध्येय ठरलें होतें. माणूस एकदा वाईट मार्गाकडे वळला, म्हणजे आपण चोखाळीत असलेला मार्ग वाईट आहे, याची त्याला जाणीव होत नाही; पण एकदा त्याचा पुरा कडेलोट झाला, म्हणजे तो पुनः मागे वळून पाहूं लागतो, त्याला आपली चूक कळून येते, तो पुनः चांगल्या मार्गाकडे वळतो व आपल्या हातून झालेली चूक सुधारूं पाहतो. बरोबर हीच स्थिति यशवंताचीहि झाली होती !

' उद्या आपण सुटणार व सुटल्यानंतर निढळाच्या घामाने इमानें इतबारें पैसा मिळवून आपण सुखाचा संसार कराव-

याचा ' असें त्याने ठरवलेंच होतें व पुढील ' सुखाच्या संसारां'तील स्वप्नसुखें जागृतावस्थेंतहि त्याला सुख देत होतीं. आता त्याची सुटका होण्याला रात्रीच्या फक्त आठ तासांचाच अवधी होता; पण तो त्याला आठ तपांइतका कंटाळवाणा व त्रासदायक वाटत होता. आजपर्यंतचे दिवस त्याने, झालेल्या दृढनिश्चयाच्या बलावर दुःखांतहि सुख मानून काढले होते; पण हा आठ तासांचा अवधी त्याला महा भयंकर वाटत होता. रोज त्याला संध्याकाळीं ८ वाजतांच झोप येई; पण आजचा दिवस निराळा होता.. ' उद्या सुटका होणार! ' या कल्पनेने व भावी सुखस्वप्नांनी त्याला निद्रादेवी प्रसन्न होत नव्हती.कोठे एखादी गुंगी यावी, तोंच खळ्दिशी हातांपायांतील बेड्यांचा खळ्खळाट् होऊन तो जागा होई व दारांच्या लोखंडी गजांतून बाहेर पाही; परंतु अजूनहि रात्र संपलेली नाही, दिवस उगवलेला नाही, हें कळून आल्यावर त्याला मनस्वी दुःख होई ! पण मनुष्याच्या मनाप्रमाणेच जर साऱ्या गोष्टी घडूं लागल्या तर—तर कसें होईल?

आता त्याची सुटका झाली होती व तो पूर्ण स्वतंत्र झाला होता. दहा पांच ठिकाणीं चौकशी केल्यानंतर त्याला मनाजोगी नोकरीहि मिळाली. त्याचा मालकहि चांगला गृहस्थ होता. होतां होतां चार पांच वर्षें झालीं. यशवंतापाशी आता बराचसा—त्याच्या दृष्टीने—पैसा जमला होता. लग्न करून संसार करावा, अशी त्याला इच्छा झाली. आपला नोकर लग्न करणार असल्याचें समजून येतांच त्याच्या दयाळू मालकाने त्याला अनेक प्रकारें मदत केली. त्याचें

लग्न झालें व त्याचा नवा संसार सुरू झाला. त्याची पत्नीहि त्याला अनरूप अशीच मिळाली होती. त्याला सर्व रीतींनी सुख मिळूं लागलें. लवकरच यथाकालीं त्या जोडप्याला एक मुलगाहि झाला. पहिलें फूल, पहिलें मूल ! त्याचा आनंद अवर्णनीय असतो. यशवंत आता पूर्ण आनंदांत होता; त्याला यापेक्षा अधिक सुखाची अपेक्षा नव्हती. आज तीं पतीपत्नी आपल्या आवडत्या एकुलत्या एक मुलाला पुढयांत घेऊन खेळवीत होतीं. त्यांचा छोटा शंकर आपल्या बालसुलभ बोलांनी व लीलांनी त्या उभयतांना कल्पनातीत सुख देत होता. इतक्यांत—

खाड्दिशी कोठडीचा लोखंडी दरवाजा उघडला गेला व व वॉर्डरने हाक मारली, ' यशवंत! '

यशवंताची सुखी स्वप्नसृष्टि—ती बायको, तो छोटा शंकर साऱ्या गोष्टी त्याच्या दृष्टीपुढून नाहीशा झाल्या. बावरलेल्या दृष्टीने तो वॉर्डरकडे पाहूं लागला. त्याला एक एक गोष्टीची आठवण होऊं लागली. ' तर मग सारें स्वप्नच तें !' या विचाराने त्याला अत्यंत दुःख झालें व त्या दुःखातिरेका-च्या भरांत त्याच्या डोळ्यांतून दोन अश्रुबिंदू खळ्कन् गळाले! व एक दीर्घ निःश्वास त्याच्या मुखांतून बाहेर पडला. त्याच्या मनांत पुनः विचार आला, ' हें स्वप्न खरें होईल काय ? '

पुनः वॉर्डरचा कठोर आवाज गरजला, ' यशवंत! काय असा भेकऱ्यासारखा पाहतोस ? वेड तर नाही लागलं तुला ? आज तुझी सुटका व्हायची, म्हणून तूं आनंदांत

असायचं खरं म्हटलं तर ! पण तुझं पहावं तें सारं जगावेगळंच ! रडतोस काय बेट्या ? चल, तुला जेलरसाहेब बोलावताहेत.'

यशवंताच्या एकंदर कृतीचें त्या 'बुड्ढ्या' वॉर्डरलादेखील मोठें आश्चर्यच वाटलें व तें कां वाटूं नये? आज त्याच्या सुटकेचा दिवस ! तो अगदी आनंदांत असायला पाहिजे होता. आजपर्यंत हजारो कैदी त्या वॉर्डरच्या हाताखालून ( खरें म्हटल्यास सोट्याखालून ) गेले होते. प्रत्येंकाला सुटकेच्या दिवशीं अत्यानंद होई. मग यशवंतालाच कां वाईट वाटावें ? त्याच्या डोळ्यांतून पाणी कां यावें ? त्या कठोरहृदयी वॉर्डरलाहि यशवंताचें दुःख पाहून वाईट वाटलें.

तरीहि यशवंत स्तब्ध बसलेला पाहून वॉर्डरनें प्रश्न केला, यशवंत! रडतोस कां रे बुवा ? साडेसात वाजून गेले, अजून तुझी झोप झाली नाही? '

आता कांही तरी उत्तर देणेंच भाग म्हणून यशवंत उत्तरला, ' रडत नाही साहेब ! पूर्व आयुष्यांतल्या कांही आठवणींमुळं दुःख झालं इतकंच ! '

' मग चलतोस ना जेलरसाहेबांकडे ?'

' हा आलोंच ! ' असें म्हणून त्याने आवराआवर करण्यास सुरवात केली; पण त्या स्वप्नाचा विषय अजून कांही त्याच्या मनांतून नाहीसा झाला नव्हता व नाहीसा होणेंहि शक्य नव्हतें ! त्याच्या मनांत वारंवार प्रश्न उभा राही, ' हें स्वप्न खरं होईल का ? '

' यशवंत! पुढं तूं काय करणार?' वॉर्डरने विचारलें.

' मी अजून कांहीच ठरवलं नाही साहेब ! पण एवढा मात्र माझा अगदी निश्चय झालाय् की पुनः इथं मात्र यायचं नाही ! ' त्याने आपल्या दृढ निर्धाराचें स्मरण करीत उत्तर दिलें.

' फार उत्तम ! ' वॉर्डरसाहेब मान डोलवीत उद्गारले. ' फार उत्तम ! पुनः या चोरीच्या धंद्यांत कधीच पडूं नको. चांगला उद्योग करून पोट भरतां येत नाही असं का आहे?'

' मीही तसंच ठरवलंय् साहेब ! इमानानं नोकरी करून निढळाच्या घामानं पोट भरावं अन् सुखानं संसार करावा, अशीच माझी इच्छा आहे. इथून सुटलों की मी अगदी सच्चे-पणानं वागणार ! ' असें उत्तर देत यशवंताने आपलें सामानसुमान खाकोटीस मारलें व गेलीं तीन वर्षें जेथें त्याने बरेवाईट विचार करीत काढलीं, ती खोली--कोठडी डोळे भरून तो पाहूं लागला.

पण त्या वॉर्डरला त्याचें हें 'रेंगाळणें' आवडलें नाही.

' अरे यशवंत, चल ना लौकर ! किती वेळ वाट पाहूं तुझ्यासाठी ? जेलरसाहेब रागावतील ना तुझ्यावर अन् माझ्यावर ! खोलीकडे वारंवार किती पाहतोस ? पुनः ती पहायला मिळेल कीं नाही अशा शंकेनं का?' वॉर्डरसाहेबां-ना विनोदाची लहर आली. ' वेड्या ! कांही काळजी करूं नकोस ! तूं इथं यायचं नाही म्हणून ठरवलंस, कसाहि दृढ निश्चय केलास, तरी तुझ्या नशिबांत काय आहे, कुणास ठाऊक ? पुनः तुला इथं यावं लागेल, याच खोलींतहि रहावं लागेल ! कुणी सांगावं नाही म्हणून ! होय ना?'

'होय साहेब ! तुम्ही म्हणतां तें अगदीं खरं आहे. माझ्या फुटक्या नशिबांत काय काय लिहिलं आहे कुणाला ठाऊक ? ' असें विषण्ण व जड स्वराने उत्तर देत तो वॉर्डरबरोर चालूं लागला. जेलरसाहेब त्याची वाटच पहात होते. त्याचे जुने कपडे त्याला मिळाले. यशंवत कैद्याच्या वेषांतून मुक्त झाला. त्यानंतर चार उपदेशामृताने घुटके पाजून जेलरसाहेबांनी त्याची मुक्तता केली; यश वंत सुटला! या सुटकेने त्याला फार आनंद झाला. तुरुंगाच्या मोट्या ' द्वारां'तून बाहेर पडत असतां, वारंवार तो आपल्या दृढ निश्चयाची उजळणी करीत एक एक पाऊल टाकीत होता. पण थोडें चालून गेल्यानंतर त्याच्या मनांत प्रश्न उभा राहिला, ' आता कोठे जावें? '

चारी दिशा त्याला मोकळया होत्या; कुठेहि जाण्याला त्याला आता अडथळा नव्हता; तरी पण 'कोठे जावें ?' असा विचार त्याला पडलाच; कारण आपल्या पूर्वाश्रमींच्या 'मित्रां' ना आता मुळीच तोंड दाखवावयाचें नाही, किंवा आपल्या ' घरच्या ' मंडळींनाही हें आपलें ' काळें ' झालेलें तोंड दाखवावयाचें नाही असें त्याने ठरवलें. त्याची आई अद्याप जिवंत होती, त्याचें तिच्यावर अतिशय प्रेमहि होतें. तिला भेटून पश्चात्तापाचे अश्रू तिच्या पायांवर पाडावेत असेंहि त्याला वाटे; पण आपलें तोंड काळें ! आपल्या तोंडाचा काळा रंग तिच्या तोंडाला फासण्यांत काय अर्थ ? असा विचार उत्पन्न होऊन तो बेत त्याने दूर सारला. वर्ष दोन वर्षें कुठेहि इमानाने नोकरी केल्यानंतरच आपलें उजळ झालेलें मुखच आईला व आपल्या माहितीच्या मंडळींना

दाखवावयाचें असें त्याने ठरवलें व पाय नेतील तिकडे तो धाऊं लागला.

* * *

'यशवंत !' भाऊसाहेबांनी- यशवंताच्या नव्या धन्याने हाक मारली.

'आलों भाऊसाहेब!' असें उत्तर देतां देतां तो तेथे येऊन दाखल झाला.

'यशवंत !' पुन: भाऊसाहेबांनी हाक मारली.

'कशाला बोलावलं धनीसाहेबांनी ?' त्याने प्रश्न केला.

'यशवंत! तुझं नांव किती गोड आहे रे ?' भाऊसाहेब आपल्याला होत असलेला आनंद दर्शवीत म्हणाले.

'असं काय बोलतां धनीसाहेब, मला गरिबाला ?' धन्याच्या अनपेक्षित उद्‌गारांनी बावरून गेलेला यशवंत म्हणाला.

'अरे, तुम्ही गरीब असाल; पण तुमच्या अंगीं जर सद्‌गुण असतील, तर तुमची स्तुती करूं नये आम्हीं ? तुझ्या नांवाप्रमाणच तुझा स्वभाव अन् तुझी वागणूक इतकी गोड अन् दुसऱ्याला तुझ्याकडे आकर्षणारी आहे म्हणून सांगूं यशवंत ?' भाऊसाहेब आपल्या नव्या नोकरावर खूष होऊन त्याची स्तुति करीत होते; पण त्यांच्या बोलण्यांतील शब्दांचे अर्थ त्याला क्वचितच कळत होते-निदान त्याच्या भावशून्य मुद्रेवरून त्याला त्यांच्या शब्दांचा अर्थ समजत होता, असें दिसत नव्हतें.

‘ असं बोलूं नका धनीसाहेब माझ्याबद्दल ! मला काय कळतंय् त्यांतलं ? इमानं इतबारं आपली सेवा-चाकरी करावी अन् आपण जें काय पोटापाण्याला द्याल त्यांत आनंद मानावा, एवढंच मला कळतंय्! ’

‘ अरे, पण एवढं कळणारे अन् त्याप्रमाणे वागणारे नोकर कुठं मिळतात? असा तुझ्यासारखा एखादाच आढळतो. खरोखर यशवंत, तुझ्यासारखा नोकर मिळायला भाग्यच लागतं बाबा! भाग्य म्हणूनच तुझ्यासारखा नोकर मला मिळाला! ’ आपल्या हृदयांतील भाव व्यक्त करीत भाऊसाहेब म्हणाले. या स्तुतीने यशवंताचा जीव आंतल्या आंत गुदमरूं लागला. कांही तरी काम काढून तिथून निघून जाण्याचें कारण तो शोधूं लागला.

भाऊसाहेब पुढे बोलूं लागले, ‘ यशवंत ! आजपर्यंत पुष्कळ नोकर मी कामावर ठेवले, पण तुझ्यासारखा तूंच! तुला लागून अजून चार महिनेहि झाले नसतील; परंतु तुझ्या मनमिळाऊ स्वभावामुळं, तुझ्या कार्यतत्परतेमुळं अन् तुझ्या निरलसपणामुळं आम्हां सर्वांना तुझ्याबद्दल इतका आपलेपणा वाटतो की, तूं आमच्या कुटुंबांतलाच कुणी तरी आहेस. असा भेदरल्यासारखा पाहूं नकोस. मी अगदी मनापासून अन् अगदी खरं तेंच बोलतोंय् ! यांतला एक शब्दहि खोटा नाही! कां? अशी चुळबूळ कां चालवलीस सारखी तूं? कुठं जायचंय् का बाहेर? ’

‘ होय धनीसाहेब! छोट्या साहेबांना फिरायला न्यायची वेळ नाही का झाली? पांच वाजून गेले आता. ’ यशवंताने

धन्याच्या स्तुतीच्या माऱ्यांतून सुटका होण्याकरिता सबब पुढे केली; पण भाऊसाहेब अशा लंगडया सबबींना दाद देणारे नव्हते. तिकडे दुर्लक्ष करीत त्यांनी पुनः प्रश्न केला,

'यशवंत ! तुझं गाव कुठं आहे म्हणून सांगितलंस तूं?'

'तिकडे साताऱ्याच्या पलीकडे आहे धनीसाहेब!'

'घरीं कोण कोण आहेत तुझ्या?'

'घरी आई, भाऊ, बहीण वगैरे माणसं आहेत.'

'अन् बायको?' भाऊसाहेबांनी पृच्छा केली.

'अजून लगीन झालं नाही; माझं धनीसाहेब!'

तुरुंगांतील शेवटच्या रात्रीं पडलेलें स्वप्न त्याला अकस्मात् आठवलें व त्या आठवणीने त्याच्या डोळयांत टचकन् अश्रू उभे राहिले. त्याने ते मान बाजूला करून न दर्शविण्याचा प्रयत्न केला; पण तो सफल झाला नाही. त्याच्या चाणाक्ष पण प्रेमळ धन्याने त्याचें तें दुःख ताडलेंच.

'वेडया! लग्न झालं नाही म्हणून दुःख करतोस, काळजी करतोस? आता तुला त्याची काळजी कां? मी आहे ना तुझ्या सुखाकडे लक्ष पुरवायला समर्थ? आणखी थोडया दिवसांनी तुला छानशी बायको आणतों, मग तर झालं? तुझ्यासारख्या नोकरांच्या सुखसोईकडे लक्ष आम्ही दिलं नाही, तर आम्ही मालक कसले?' त्याच्या पाठीवरून प्रेमळपणाने हात फिरवून ते म्हणाले.

‘ बरं आहे यशवंत! जा आता तुझ्या ‘ साहेबां ’ ना घेऊन फिरायला! पण जप बरं का–गाड्या, घोडी, मोटारी सारख्या हिंडताहेत रस्त्यांतून! तुला सांगायला नकोच हें! ’

मानेनेच ‘हो’कार दर्शवून यशवंत तेथून निसटला–

❦ ❦ ❦

वरील प्रकारावरून यशवंताने, आपल्या निरलस व आपुलकीच्या वर्तनाने आणि सेवेने आपल्या नव्या धन्याला किती प्रसन्न व खूष ठेवलें होतें, तें पुन: वर्णन करून सांगण्याचें मुळीच कारण नाही. या बाबतींत तरी तो खरोखरीच ‘ यशवंत ’ झाला होता! पण त्याच्या अंत:-करणाला एक शल्य मात्र वारंवार टोचत होतें आणि तें म्हणजे आपल्या ‘ पूर्वाश्रमींच्या वागणुकी ’ बद्दल आपल्या धन्याजवळ एक चकार शब्दहि त्याने काढला नव्हता. ‘ पूर्वी कोठे नोकर होतास ? तुझ्यासारख्या नोकराला त्या मालकाने सोडलें कसें ?’ वगैरे पृच्छा एखादे वेळीं भाऊ-साहेबांनी संभाषणाच्या ओघांत केल्यास कांही तरी थाप देऊन ती वेळ तो कशीबशी मारून नेत असे; पण ही गोष्ट त्याच्या हृदयाला पुन: पुन: त्रास देई. आपल्या दुष्कर्मामुळे–दुर्दैवामुळे आपल्याला आपल्या प्रेमळ व सज्जन धन्याशीं प्रतारणा करावी लागते, याचें त्याला अत्यंत दु:ख होई आणि एखादे वेळीं आपल्या धन्याला आपली पूर्वीची हकीकत कळल्यास त्याचा परिणाम काय होईल? ही शंकाही

त्याला घाबरें करून सोडल्यावाचून रहात नसे; कारण ती शंका खरी होती.

खरोखरच वरील गोष्ट घडल्यास काय होईल?

❧ ❧ ❧

'यशवंत!' भाऊसाहेबांनी खाटेवर विवळत पडलेल्या यशवंताला हाक मारली. त्यांच्या स्वरांत दुःखाची व कळवळ्याची छटा स्पष्ट दिसत होती.

यशवंताने मोठ्या कष्टाने डोळे किलकिले करून धन्याकडे पाहिलें. त्यांच्या हाकेला प्रत्युत्तर देणेंहि त्याला शक्य झालें नाही! इतकी त्याची स्थिती मोठी कठीण झाली होती. 'छोट्या साहेबां' ना फिरायला घेऊन गेला असतां त्यांच्यावर आलेल्या गंडांतरांतून– मोटारीच्या अपघातांतून त्याने त्यांची मोठ्या शिताफीने सुटका केली; पण मोटारचा जबरदस्त धक्का त्याला लागला व बेभान अवस्थेंत त्याला घरीं आणण्यांत आलें होतें. त्याचें शरीर जखमांनी भरून गेलें होतें व त्याच्या डोक्याला एक भली मोठी जखम झाली होती. शरिरांतून भरपूर रक्त गेल्यामुळे त्याला ग्लानी आली होती. तो आताहि अर्धवट बेशुद्धावस्थेंतच होता.

आपल्या एकुलत्या एक मुलाला यशवंताने केवढ्या मोठ्या संकटांतून बचावलें होतें, याची कल्पना भाऊसाहेबांना पूर्ण आलीच होती; त्यामुळे यशवंताचे अपरंपार उपकार आपल्यावर झाल्याने व सध्या त्याची स्थिती मोठी कठीण झाल्याने, त्याजबद्दल भाऊसाहेबांना फारच काळजी वाटत

होती. एका मोठ्या डॉक्टरला आणून त्यांनी त्याच्या शुश्रूषे-कडे पूर्ण लक्ष दिलें होतें व ते स्वतः त्याच्या एकंदर व्यव-स्थेकडे लक्ष देत होते.

‘ यशवंत! आता बरं वाटतंय् का थोडं?’ त्यांनी कळव-ळयाने प्रश्न केला. पुनः मोठ्या दुःखाने डोळे अर्धवट उघ-डून त्याने आपल्या प्रेमळ धन्याकडे पाहिलें; पण त्याला उत्तर देतां आलें नाही. फक्त त्याने कारुण्य, आदर व कृत-ज्ञता यांनी ओथंबलेल्या व किंचित् ओलसर झालेल्या डोळयांनी आपल्या धन्याकडे पाहिलें व पुनः ते मिटले.

आणखी कांही दिवस गेले, भाऊसाहेबांच्या प्रेमळ शुश्रूषेने यशवंत हळू हळू सुधारत चालला होता. शरिरावर झालेल्या लहानसहान जखमा आता बऱ्या झाल्या होत्या; पण डोक्याची जखम अजून भरून आली नव्हती. शिवाय अंगांतहि अगदी त्राण नव्हतें; त्यामुळे त्याला या कुशीवरून त्या कुशीवर होण्यालाहि फार त्रास होऊन वेदनाहि मनस्वी होत. एक मनुष्य स्वतंत्रपणें त्याच्या सेवा-चाकरीकरिता भाऊसाहेबांनी नेमला होता; तोच त्याचीं सर्व कामें करी. आणखी थोडे दिवस गेले; आता यशवंत थोडथोडा हिंडूं फिरूं लागला होता. स्वस्थपणाने पडून खाणें त्याच्या अगदी जिवावर आलें होतें. घरांतील किरकोळ कामेहि तो आता करूं लागला. हें त्याच्या धन्याला आवडत नसे. आणखी कांही दिवस विश्रांती घेण्याबद्दल ते त्याला बजावीत; पण त्यांच्या आज्ञेकडे या बाबतींत तरी तो लक्ष देत नसे.

※ ※ ※

# जगाचा न्याय !

‘ यशवंत ! ’ त्याच्या ‘ छोट्या साहेबां’नी त्याला हाक मारली.

‘ काय छोटे साहेब ! ’ आपल्याच ‘कर्मा’च्या विचारांत गुंग असलेल्या यशवंताने कृत्रिमपणाने हसत हसत प्रश्न केला. नित्याप्रमाणे तो आपल्या बालधन्याला फिरण्याकरिता घेऊन चालला होता.

‘ मला एक गोष्ट सांगतोस कारे यशवंत ? ’

‘ कसली सांगू ? मला गोष्टी सांगतां येत नाहीत साहेब ! ’

‘ न यायला काय झालंरे ? एवढा मोठा झालास तूं अन् गोष्ट सांगतां येत नाही असं मुळीच व्हायचं नाही. आमचे मास्तर अन् आमचे भाऊसाहेब मला किती तरी गोष्टी रोजरोज सांगतात ! मग तुलाच गोष्ट न यायला काय झालं ? ’ बालसुलभ आश्चर्य प्रगटवीत छोटे साहेब उद्गारले.

‘ खरचं मला गोष्ट सांगतां येत नाही साहेब ! मी थोडंच शिकलोंय् तुमचे मास्तर अन् भाऊसाहेब यांच्या-सारखं ! मला कशी गोष्ट सागतां येणार ? ’

‘ तुला कसली येत असेल तसली अन् असेल तश्शी मला सांग; मग तर झालं? सांग पाहूं एकदम ! ’ छोट्या साहेबांचा आग्रह कमी होण्याचें चिन्ह दिसत नसल्याचें पाहून अखेर यशवंत म्हणाला,

‘ कसली गोष्ट सांगू ? ’

'चोराची सांग. आमचे मास्तर चोरांच्या पुष्कळ गोष्टी सांगतात अन् शेवटीं उपदेश करतात की, मुलानो ! तुम्ही कधीहि चोरी करूं नका ! आमच्या पुस्तकांतदेखील 'चोरी कधी करूं नये' अशी एक कविता आहे. मग सांगतोस ना तुझी गोष्ट यशवंत ? '

आता एखादी गोष्ट सांगितल्याशिवाय आपली सुटका होणें शक्य नाही, असें दिसून आल्यानंतर कोणत्या चोराची गोष्ट सांगावी, याचा तो विचार करूं लागला. त्याने पुष्कळ विचार केला, डोकें खाजवलें, पण सांगण्यासारखी गोष्ट कांही त्याला आठवेना. आपल्या नवीन आयुष्यक्रमांत तो इतका मुरून आणि विरून गेला होता की, आपण स्वत: एका काळीं चोरच होतों, याची जाणीवदेखील तो अलीकडे विसरून गेला होता. विचार करतां करतां एकाएकी स्वतः-च्याच 'चोर'पणाचें स्मरण झालें व ती गोष्ट त्याने सांग-ण्याला सुरवात केली; आणि कशी तरी वेडयावाकडया रीतीने व शब्दांनी ती एकदाची पुरी केली. ती सांगत असतां पूर्वपापाच्या पश्चात्तापाने त्याचा कंठ वारंवार दाटून येई व तो अडखळे. ती गोष्ट पुरी केल्यानंतर छोटया साहेबांनी प्रश्न केला-

'यशवंत! लोक चोरी कां रे करतात ? '

'पोटाला खायला मिळालं नाही म्हणजे साहेब ! ' यशवंताने तत्काळ उत्तर दिलें.

'मग ते नोकरी कां करीत नाहीत ? '

यशवंताने या प्रश्नाला कांहीच उत्तर दिलें नाही; कारण तें त्याला अगदी पटलेलें होतें. तो स्तब्ध बसलेला पाहून थोडचा वेळाने पुनः छोटचा साहेबांनी विचारलें, ' यशवंत! बोलत कां नाहीस ? '

' छोटे साहेब ! चोरांना नोकरीला ठेवीत नाहीत लोक ! '

' मग घरोघर भीक मागावी त्यांनी ? '

' खरोखर चोरी करण्यापेक्षा भीक मागणंहि बरं नाही काय ? ' यशवंताने स्वतःच्या मनाला प्रश्न केला. ' पण चोरांना—धट्टयाकट्टया चोरांना भीक कोण घालणार ? ' त्याच्या मनानें उत्तर दिलें. तो कांहीच बोलला नाही.

इतक्यांत तिकडून पोलिसांच्या पहाऱ्यांत येत असलेल्या व हातींपायीं बेडचा ठोकलेल्या एका मनुष्याला येत असलेला पाहून छोटचा साहेबांनी यशवंताला विचारलें—

' तो कोण येतोय् पाहिलास का यशवंत ? कोण असेल तो ? '

' चोरच असेल ! ' त्याने विमनस्कतेने रुक्ष स्वराने उत्तर दिलें. तें दृश्य त्याच्याने पहावेना. तो गडबडीने म्हणाला—

' छोटे साहेब! उशीर झाला ना आता ? घरीं जाऊंया चला. '

थोडचा वेळांत ते दोघे घरीं येऊन पोचले, पण यशवंताच्या मनाला आज समाधान नव्हतें. असें कां व्हावें ? त्याचें मन त्याला वारंवार उपदेश करीत होतें, ' चोरी कधी करूं नये. ' मग काय करावें ?

  

ती हकीगत भाऊसाहेबांच्या कानीं कुठून आली कुणास ठाऊक पण यशवंत एका वेळीं ' पक्का चोर होता व त्याला तीन वर्षांची शिक्षाहि झाली होती, हेंहि त्यांना समजलें आणि त्यांना प्रश्न पडला की, ' यशवंतासारख्या चोराला घरांत ठेवावें कीं नाही ? '

या गोष्टीचा विचार करीत त्यांनी बरेच दिवस घालविलें व या कालांत त्यांनी या दृष्टीने यशवंताच्या वर्तनाकडे सूक्ष्म नजर ठेवली; पण आक्षेपार्ह असें त्यांना कांहीच आढळलें नाही. पण एका काळीं पक्का चोर असलेला यशवंत इतका सच्छील व साव कसा झाला? एकदम डल्ला मारण्याच्या हेतूने हें सोंग तर तो करीत नाही ना? चोर सुधारेल काय? हे प्रश्न वारंवार त्यांच्या मनांत उभे राहून काय करावें, हेंच त्यांना सुचेनासें होई. अखेर यशवंताकडूनच या साऱ्या प्रकरणाचा खुलासा करून घेण्याचें त्यांनी ठरविलें व त्याप्रमाणे एकांतांत यशवंताला विचारलेंहि.

पहिल्या क्षणीं तो घाबरला व बावरलाहि; पण दुसऱ्याच क्षणीं स्वतःला सावरून त्याने सारी हकीकत–अगदी लहानपणापासूनची–भाऊसाहेबांना सांगून टाकली. एक अक्षरहि त्याने लपवून ठेवलें नाही. आपला धनी आपल्याकडून अजाणतां झालेल्या पापाबद्दल क्षमा करील, अशी त्याला आशा होती. आजपर्यंतचें आपलें वर्तन लक्षांत घेऊन पूर्वपापाबद्दल ते आपल्याला शिक्षा करतील, घरांतून घालवून देतील, असें त्याला वाटलें नाही. पण 'जगाची रीत' त्याला ठाऊक नव्हती. ' जित्याची खोड मेल्याशिवाय जात नाही ' असेंच तें समजतें! यशवंत! तू भोळा आहेस!

त्याच दिवसाच्या रात्रीचे बारा वाजून गेले होते, पण अद्यापि भाऊसाहेबांना झोप आलेली नव्हती. यशवंताच्या तोंडून त्याचें पूर्ववृत्त ऐकल्यानंतर व त्यांत त्याचा सत्यवक्तेपणा दिसून आला, तरीहि त्याला—एका चोराला घरांत ठेवावें कीं नाही? हा प्रश्न त्यांना अजून सोडवतां आला नव्हता. एक मन सांगे की, त्याच्यासारख्या चोराला जाणूनबुजून घरांत ठेवणें योग्य नाही! चोरच तो! आज तो कितीहि भलेपणाने वागत असला, तो कितीहि आपलेपणाने काम करीत असला, आपल्या घरच्या मंडळीवर त्याचें कितीहि अपरंपार प्रेम असल्याचें दिसत असलें तरी तो चोर आहे! त्याचा 'मूळ स्वभाव' पालटणें शक्य नाही! त्याचा तो मूळ स्वभाव केव्हा तरी उसळी मारल्याशिवाय राहणार नाही ! शिवाय त्याच्या आजच्या साळसूदपणा-बद्दल तरी कशी खात्री बाळगावी? मनांत 'डल्ला मार-ण्याचा' हेतू ठेवूनच तो हें सारें सोंग करीत नसेल कशा-वरून? त्याला घरांत ठेवणें म्हणजे समजूनसवरून खिशांत विषारी साप बाळगण्यासारखें आहे. उद्याच्या उद्या त्याला काढून टाकला पाहिजे!

असा निश्चय होतो न होतो इतक्यांत दुसरें मन त्यांना टोचूं लागे की, चोर कधी सुधारत नाही काय? पुण्यवंतांना भूतकाळ तर पाप्यांना भविष्य काळ नसतो काय? अट्टल चोर सुद्धा सुधारणें शक्य आहे. चोरी करणें ही कांही मनु-ष्याची स्वाभाविक प्रवृत्ती नाही! परिस्थितीच्या कुटिल-पणाने घडून येणारी ती एक क्रिया आहे. याचमुळे दुर्गुणी

मनुष्यें सुधारून सद्गुणी झाल्याचें वारंवार घडून येत नाही काय? यशवंताने सांगितलेली सर्व हकीकत जर खरी असेल तर परिस्थितीच्या आणि वाईट संगतीच्या प्रभावामुळेच तो या फंदांत सापडला असें दिसत नाही काय? प्राणांतिक अपघातांतून ' छोटया साहेबां ' ना त्याने बचावलें, यांत त्याचा कोणत्याहि प्रकारचा स्वार्थ साधण्याचा हेतु होता काय? मुळींच नाही. यशवंत मूळचा चोर खरा, पण तो आता सुधारला आहे. आता त्याला ठेवून घेण्याला कांहीच हरकत नाही!

अशा परस्परविरुद्ध विचारांचें तुमुल युद्ध सारखें चालू होतें. एक वेळीं एक विजयी होई, तर दुसऱ्या वेळीं दुसरा यशस्वी ठरे! असा बराच वेळ निघून गेला. दोन वाजूनहि गेले. विचाराने भाऊसाहेबांचें डोकें भणभणूं लागलें! वस्तुत: एक क्षुल्लक नोकर तो काय आणि त्याच्याबद्दल इतका विचार तो कसला करावयाचा? असेंच कोणीहि म्हणेल; पण यशवंताने आपल्या वागणुकीने व गोड आणि निरलस स्वभावामुळे सर्वांनाच आपलेंसें केलें होतें. भाऊसाहेबांचें मनहि त्याने भारून ठेवलें होतें; त्यामुळेच त्यांना या क्षुल्लक दिसणाऱ्या प्रश्नाचाहि तडकाफडकी निकाल लावणें अशक्य होऊन बसलें होतें.

इतक्यांत जवळच्या बागेंतील एका झाडावरून घुबडाचा घूत्कार सुरू झाला व भाऊसाहेबांच्या फार विचाराने त्रासून गेलेल्या मनाने त्यांतून अशुभपणाचाच अर्थ काढला. झोपे-मुळे यापुढे विचार करणेंहि त्यांना अशक्य झालें आणि

अखेर यशवंताला दुसऱ्या दिवशीं काढून टाकण्याचा विचार नक्की करून ते झोपी जाण्याचा प्रयत्न करूं लागले.

तिकडे यशवंताचीहि तीच अवस्था झाली होती. 'आता पुढे काय होणार ? धन्यांनी नोकरीवरून काढून टाकल्यास काय करावयाचें ? ' हे विचार त्याला सारखा त्रास देत होते व घुबडाचा भीषण घूत्कार त्याचें हृदय शंकाव्याकुल करीत होता ! त्याच्या शरिराची व हृदयाची सारखी तळमळ चालू होती व यांतच सारी रात्र निघून गेली. सकाळ झाली, तो उठला व धडधडत्या हृदयाने नित्यक्रमाला लागला.

  

यशवंताला एकीकडे बोलावून भाऊसाहेबांनी आपला मनोदय त्याला कळविला. यशवंतालाहि या प्रसंगाची साधारण कल्पना होतीच. पगाराशिवाय बक्षिसादाखल म्हणून शंभर रुपये भाऊसाहेबांनी त्याच्या हातावर ठेवले. त्यांचा दृढ निश्चय झालेला पाहून त्यानेहि एका शब्दाने सुद्धा त्यांना विनवलें नाही. बक्षिसाची रक्कमदेखील त्याला नको होती; पण 'हृदय ' हवें होतें, आपलेपणाने त्याजकडे पाहणाऱ्या प्रेमळ हृदयाची त्याला अपेक्षा होती! दुरूनच छोट्या साहेबांचें त्याने एकदा दर्शन घेतलें व आपला फाटका संसार खाकोटीला मारून त्याने त्या घराचा कायमचा निरोप घेतला. त्याचे डोळे भरून आले; पण त्याचे अश्रु पाहण्याची 'जगा'ला जरूर नव्हती !

  

आणखी कांही ठिकाणीं नोकरी मिळविण्याचा त्यानें प्रयत्न केला; पण त्यांत यश आलें नाही ! ‘ पुढे काय करावें ? ’ याबद्दल पुष्कळ विचार करूनहि त्याला कांहीच मार्ग सुचेना व थोड्याच दिवसांत त्याला पुन: आपला जुना धंदा ’ सुरू करणें भाग पडलें !

  

आज यशवंत पुन: तुरुंगाच्या दारीं पाऊल ठेवीत होता; पण त्याबद्दल त्याला वाईट वाटत नव्हतें अगर पश्चात्तापहि होत नव्हता! ‘ बाहेरचें जग ’ आपल्या जीवनक्रमाला योग्य नाही; तुरुंगांतच आपलें सारें आयुष्य जाणार, हें त्याला स्पष्ट कळून चुकलें होतें ! तोच वॉर्डर, तीच खोली, त्याच बेड्या, हाच त्याचा जन्माचा संसार !



# मनाची घडण

( लेखक— श्री० श्री० ग० दांडे. )

किती सुन्दर त्यांचें वैवाहिक जीवन चाललें होतें ! मला तर शरदचा हेवा वाटे. पण आता हेवा वाटून उपयोग काय होता ? मी होऊनच आलेली संधी गमावली होती. बाकी माझा तरी दोष कसा म्हणूं ? ज्या माणसावर आपण अकृत्रिम प्रेम करतों, तेंच माणूस अति परिचयाने म्हणा, अगर त्याच्या गुणाकडे बघणारी दृष्टि बधिर होऊन म्हणा कित्येक वेळा नकोसं होतं. असल्या विलक्षण कल्पना-मुळेच मला अरविंदांच्या सहवासाला कायमचें मुकावें लागलें होतें.

आमच्या घराशेंजारींच अरविन्द रहात असत. त्यांच्या प्रेमळ नित्याखेरोज मायेचं त्यांच्या घरांत कुणीच नव्हतं. मी मधून मधून त्यांचे घरीं जात असे. तर मला कितीदा

तरी नानांनी– अरविन्दांच्या वडिलांना आम्ही नाना म्हणत असूं–मुद्दाम बोलावून घेऊन तासन् तास माझ्याशी गमतीनं बोलावं, हसावं, कौतुक करावं, असं चाले.

अरविन्द त्या वेळीं कॉलेजांत बी. ए. च्या वर्गांत असे. तो सुट्टींत गावीं आला की, आमच्या घरी रोज आल्यावाचून त्यालाही चैन पडूं नये. सुट्टींतले दिवस आमचे मोठे गमतीचे जात. तो परत कॉलेजांत जातांना मला व नानांना मनस्वी वाईट वाटावें. नानांच्या कष्टाळू जीवनाबद्दल अरविन्दालाही फार वाईट वाटे. हाडांचीं काडें करून आपले वडील आपल्याला शिकवितात, या जाणिवेने त्याचें अन्तःकरण फाटत असे.

नाना पेन्शनर मास्तर होते. ते सध्या कोठेतरी २–३ शिकवण्या करून चरितार्थ चालवीत व पेन्शन अरविंदाचे शिक्षणाकडे खर्च करीत. बाकी अलीकडे हेही कष्ट त्यांचे हातून होत नसत. ते वरचेवर बाजारी पडूं लागले व अखेर त्यांनी अंथरूण धरलें.

आमची आई नानांचें मधून मधून पथ्यपाण्याचें व औषधाचें पाही. पण नाना फार करारी, त्यांना दुसऱ्याचा एवढासाही उपकार नकोसा वाटे.

ते असेच एकदा आईला म्हणाले, 'राधा अक्का ! तुम्ही कां विनाकारण त्रास घेतां? अहो, आमचें आता काय राहिलें आहे? बऱ्याने वाइटाने कसें तरी मी बी. ए. पर्यंत अरविंदाला शिकविला आहे. तो आता स्वतःच्या पायावर उभा राहण्यास समर्थ झाला आहे. वाटेल तो नोकरीधंदा करून

आपलें व आपल्या बायकोचें पोट भरील. मी आपला मरायला मोकळा!'

आई म्हणाली, 'असं कसं म्हणतां नाना? अहो, तुमच्या डोळ्यांनी अरूला नोकरी लागलेली, लगीन झालेलं पहायला पाहिजे.'

'मग देतां का आमच्या घरीं तुमच्या कमळीला? घालतांय् का वठलेल्या झाडाला पाणी?'

आई चट्कन् 'हो' म्हणून गेली. पण पुन्हा बोलली, 'नाना! तुम्हाआम्हाला वाटून उपयोग काय? मुलांमुलींना पसंत पाहिजे ना! त्यांची तयारी असल्यावर आपलें हो काय?'

मी त्या वेळीं जवळच होते; पण नानांनी मला विचारलें नाही. कां, तें मला ठाऊक नाही. आईच्या संदिग्ध उत्तराने ते जरा नरमलेच. वास्तविक आमच्या व नानांच्या परिस्थितींत जमीनअस्मानाचें अंतर होतें. आम्ही गर्भश्रीमंत तर नाना म्हणजे कफल्लक दरिद्री. उत्पन्न अगदी बेंताचेंच इतकेंही झालें तरी आईच्या व दादाच्या इच्छेविरुद्ध मला लग्नच करायचें झालें असतें तर मी अरविंदाशींच केलें असतें.

  

पण कां कुणास ठाऊक? मला त्या वेळीं तरी लौकर लग्न करावेंसें वाटलें नाही. अरविंदानेही एक दोनदा मला याबाबत विचारलें होतें. पण मी त्याला थांग लागूं दिला नव्हता.

आता तर अरविंदाला अगदीच असहाय वाटत होतें. कारण नाना अगदीच अंथरूण धरून राहिले. त्यामुळे B. A.

ची टर्म तशीच अर्धी सोडून तो घरीं आला. नानांना बरें वाटण्याबद्दल तो शिकस्त करी. नानांना आपले इहलोकचे दिवस संपुष्टांत आल्याचें दिसत होतें.

नानांनी एक दिवस अरविंदाला अंथरुणाजवळ बोलावलें. ' माझी मुदत सरत आली आहे. मला आता फार थोडे दिवस इथे काढायचे आहेत. तूं मात्र विचाराने आपल्या आयुष्याचें तारूं हाकार. तूं नोकरी मिळविशील, याबद्दल मला संदेह नाही; तथापि सांगायचें एकच की, गरीब कुळांतील पण दक्ष व कर्तबगार मुलगी पाहून लग्न कर.'

अरविंदाने ' हो ' म्हटलें. माझें काळीज चरं झालें माझ्याशीं अरविंदाने लग्न करूं नये, असा नाही कां याचा ध्वनी झाला ? खरंच श्रीमंती हा खऱ्या प्रेमांत केवढा अडसर आहे ! मला नानांचा राग आला. पण मरणाच्या दारीं पडलेल्या माणसावर रागावून उपयोग काय? नानांचा तरी त्यांत दोष काय होता? माझ्या आईची तरी मनापासून कुठे इच्छा होती? मला स्वतःला सुद्धा प्रेम असूनही अरविंदाशीं लग्न करावें असें अजून कधी वाटत होतें? आता मी अरविंदाच्या नानांवर रागावूं, माझ्या आई-दादावर रुसूं कीं स्वतःवर जळफळूं? मला कांहीच उमगेना.

थोड्याच दिवसांनी अरविंदाचा एकमेव आधार तुटला, नानांनी इहलोकची यात्रा संपविली, अरविंद पोरका झाला! आता मला त्याच्याबद्दल अनुकंपा वाटूं लागली. पण अजूनही त्याच्याशीं लग्न करावयास माझें मन घेईना.

अरविंदाला नोकरी पाहणेंच भाग होतें. बऱ्याचशा खट-

पटीने त्याला मुंबईस एका वर्तमानपत्राच्या कचेरीत सहसंपादकाची नोकरी मिळाली. आर्थिक दृष्टया ठीक झालें; पण प्रापंचिक दृष्टया त्याचा उन्हाळा सुरूच होता. एक दिवस मी खोलींत एकटीच विचार करीत बसलें होतें. पोस्टमनने माझे नावचें एक पाकीट आणून दिलें. तें अरविंदाचें पत्र होतें. कित्येक दिवसांत त्याचें कांहीच वर्तमान कळलें नव्हतें. मी उत्सुकतेने पत्र वाचूं लागलें. पत्रांतला सारांश पुढील-प्रमाणें होता—

'कमल ! मरणसमयींच्या नानांच्या इच्छेविरुद्ध मी तुला माझ्याशीं लग्न करणेबद्दल पृच्छा करणें हें माझ्या प्रेमळ पित्याचे इच्छेशीं प्रतारणा करण्यासारखें आहे. तथापि माझ्या स्वभावाची तुझ्याइतकी कुणालाच पारख नसल्याने प्रपंचांत तुझी जोड मिळाल्यास माझ्या आयुष्यातील यशाच्या वाटयाचें सर्व श्रेय तुला देतां यईल. मनाची श्रीमंत पण हाडाची गरीब, जन्मजात खानदानी पण अलौकिक स्वार्थत्याग करून येईल त्या स्थितींत समरस होण्याची विचारांची व आचारांची निकोप घडण तुझ्या-वाचून इतरत्र सापडणें दुर्मिळ. तुझ्या सहानुभव व प्रेमळ सोबतीवाचून जगाच्या बेफाट वावटळींत एकटयाने शिरायला मला धीरच होत नाही. तुझ्या आधारावर धकाधकीच्या मामल्यांत बेछूट स्वैरायला नड नाही. आजच्या घडीला तरी माझे सर्व विचार तुझ्याकडे केंद्रित झाले आहेत. माझी जोडीदार होण्यास तूं कबूल असल्यास तुझ्या अमोल स्वार्थ-त्यागाबद्दल कृतज्ञ राहून आपला जीवनौघ सुखप्रवाही होण्या-करिता मी प्रयत्नांची शिकस्त करीन. तुझ्या स्वार्थत्यागामुळे

माझ्या ध्येयप्रवणतेकडे निश्चित लक्ष राहून मला चैतन्य-युक्त उल्हासाची सदैव स्फूर्ति मिळेल. विचार करून काय तें ठरीव.

'दुसऱ्याची ताबेदारी पत्करूं नये, ह्रा तुझा मानस मी फार पूर्वीपासून ओळखून आहें. पण पतिपत्नींनी एकमेकांची प्रेमळ ताबेदारी पत्करल्यावाचून आयुष्यांत कांही आनंद असेल, असें मला वाटत नाही. लग्न न करतां तू राहिलीस तर हा अनुभव तुला येणार नाही असें नाही. आमच्या नानांप्रमाणे अवास्तव करारी राहून आयुष्य नीरस करावें असें मला वाटत नाही. म्हणूनच थोडें पडतें घेऊनही तूं माझ्याशीं संबंध जोडूं इच्छीत असल्यास जरूर तसा प्रयत्न करून पहावा, या भावनेने मुद्दाम तुला लिहिलें आहे.

'भलत्याच कल्पना मनांत बाळगून आयुष्याचे निष्कारण धिंडवडे उडवावेत व शेवटीं अपयशाचाच आढावा काढावा हें मला बिलकूल रुचत नाही. आयुष्य हें स्वकष्टार्जित आनंदाचा मनमोक्त उपयोग घेण्याकरिता आहे, असें माझ्याप्रमाणे तुला नाही का वाटत?

'एवढ्या आग्रहानेही तुला आपलीं मतें बदलणें शक्य नसेल तर ध्येयवादी असलों तरीही संसाराचे तीन तेरा करून संन्यस्त आयुष्य पत्करून जीवनांतील आनंद नाहीसा करावा, असें माझें मत नाही. तूं नच तयार झाल्यास दुसऱ्या एखाद्या अनुरूप तरुणीशीं विवाहबद्ध होऊन मी आयुष्य-क्रमणास लागेन.

'पूर्वपरिचयावरून व ह्या पत्रावरून माझ्याविषयी

ज्या भावना ठेवणें तुला परवडत असेल, त्या ठेऊन आपला निर्णय शक्य तों लवकर कळीव.

'मनुष्यस्वभाव सहवासप्रिय आहे.यापुढे एकलकोंडें निष्प्रेम आयुष्य माझ्याने निभणार नाही. तुझ्या उत्तराची वाट पहात आहें.

तुझ्या सहवासाची अपेक्षा करणारा
**अरविंद**

बरेच दिवसांत अरविंदांचें कुशल कळलें नव्हतें, तें ह्या पत्रांतून कळल्याबद्दल आनंद वाटला. त्यांनी तडकाफडकी एकदम लग्नाची मागणी घातल्याबद्दल आश्र्यर्याचा धक्का बसला. अगदी निकरावर व एकेरीवर येऊन त्यांनी लिहिलें होतें– 'मनुष्यस्वभाव सहवासप्रिय आहे. यापुढे एकल-कोंडें निष्प्रेम आयुष्य माझ्याने निभणार नाही.' मी लग्नाला तयार न झाल्यास ते दुसरीकडे मागणी घालणार होते. मला किंचित् विषादपूर्ण उद्विग्नता वाटली.

कितीतरी दिवस माझे विचारांतच गेले. अरविंदाला मी उत्तर लिहूं शकलें नाही. अरविंदाशीं लग्न करण्याबद्दल माझा निश्चयही होईना. एकंदर पुरुष-जातीबद्दल मला तिटकारा वाटत होता का ? छे, तसेंहि नाही. पण हें मात्र निर्विवाद की लग्न करून–मग तें कुणाशींही असो–आपलें स्वातंत्र्य गमावूं नये. मला अरविंदाबद्दल प्रेम वाटत होतें; पण तें केवळ पत्नीला पतीबद्दल वाटावें अगर प्रियकरणीला प्रियकराबद्दल वाटावें असें होतें असें मला वाटेना. माझा कांहीच निर्णय होऊं शकला नाही; पण त्यामुळे अलीकडे

अरविंदाने निष्कारण माझ्या मनःसरांत आवर्त निर्माण केलें, अशी मात्र माझी खात्री झाली. मी अगदी बेचैन झालें.

आईने मला विचालें– ‘कमळे! का गऽ अलीकडे सुकल्या-सारखी दिसतेस ? ’

‘कुठे! तुझें आपलें उगीच कांही तरी ’ असें उडवा-उडवीचें उत्तर मी दिलें.

आईच ती ! एवढ्या उत्तराने गप्प बसली; पण तिचें समाधान झाल्यासारखें दिसलें नाही. कसल्या तरी काळजीने मला पोखरलें आहे, असें तिला वाटूं लागलें.

पुष्कळ दिवसांच्या विचाराने मी आपलीं मतें दृढ करूं लागलें. माझ्या मत्सरी हट्टी मनाला पिछेहाट पटणें शक्य नव्हतें. नानांनी मरतांना सुद्धा माझ्याशीं लग्न करण्याबद्दल अरविंदाला सुचवूं नये? माझा अभिमान इरेस पेटला. मी कायम ठरवलें व एक दिवस ‘मला तुझ्याशीं लग्न करतां येत नाही. तूं बेलाशक दुसऱ्या मुलीशीं लग्न करून सुखी हो ’ असें मी अरविंदाला कळविलें.

माझ्या उत्तराने अरविंदाला वाईट वाटलें असावें. तोही नानांचा मुलगा होता. ध्येयवादी असला तरीही हळवा भावनोद्रेक त्याच्यामध्ये नव्हता. त्याच्याही करारीपणाला मी धक्का दिला होता.

कांही दिवसांनी अरविंदाने लग्न केल्याचें मला समजलें. अनुरूप वधूशीं त्याचें लग्न झालें.

पुढे कांही दिवसांनी आपला संसार पाहण्याकरिता त्याने

मला बोलाविलें. न जाण्याचा माझा निश्चय टिकला नाही. मी त्याचे लग्नानंतर दीड वर्षाने त्याचेकडे गेलें. अरविंदाला व शरद्ला मला पाहून अपरिमित आनंद झाला.

शरद्च्या मांडीवर अरुण खेळत होता. अरुणाच्या आगमनाने अरविंद–शरद्ची जोडी किती सुखांत दिसत होती! पण काय तरी मेला स्वभाव ! मलाही कांही त्यांच्या सुखांत खरें समाधान वाटलें नाही. माझी जागा शरदने पटकावली, असा खोटा अभिमान मला आता जाळूं लागला.

दोनच दिवस त्यांचेकडे राहिल्यावर मी जायला निघालें. एकपरी मी आलेंच नसतें तर बरें होतें, असें मला झालें.

मी जायला निघालें.

अरविंद म्हणाला, 'कमल! दोनच दिवसांकरिता आलीस अन् लगेच चाललीस, हें गऽ काय ? रहा ना चार दिवस.'

'खरंच, कमळावन्सं! राह्यलात चार दिवस म्हणून काय बिघडलं ?' शरदने पुस्ती जोडली.

'कमळावन्सं !' या संबोधनाने मला शरदचा संताप आला. किती वेडी मी? मला असें कां वाटावें? याचा उलगडाच होईना. स्वतःचें सान्त्वन करण्याचा शक्य तो प्रयत्न केला; पण छे:! मला तिथे राहणें शक्यच नव्हतें. मला त्यांचें सुख पाहवत नव्हतें हेंच खरें.

पण मी होऊनच त्यांच्या लग्नाला संमती दिली होती ना? हो, तें खरं सारं, पण माझ्या अंतर्मनाची गळचेपी करूनच ना? माझ्या हृदयांत वणवा पेटला; पण त्या खाईंत या सुखी

ओडप्याचा मी कां म्हणून बळी घ्यावा?

मी जायला निघालें—

अरविंद म्हणाला, 'कमळ! दोन दिवस राहिलीस; पण मोकळेपणाने नाही राहिलीस. कां गऽ असं?'

किती साधा निर्विकार प्रश्न! पण ब्रह्मांड उभें केलें माझ्यापुढे. एखाद्याने खरें सांगितलें तर माणसाला केवढा राग येतो, हें या वेळीं मला पटलें. मी उद्गारलें, 'छे: कांहीतरीच. मला फार कामं आहेत. गेलंच पाहिजे.'

मी जायला निघालें.

अरविंद शरद् मला पोचवायला आले. मी शरदचा निरोप घेऊं लागलें, तोंच धाकटा अरुण मजकडे येण्यासाठी झाप टाकूं लागला. माझें सारें अवसान गळून गेलें. किती निष्पाप बालक! शरद्ने तरी माझा काय अपराध केला होता? वा! नव्हता कसा? पण मग मी लग्न केलें नाही तर अरविंदाने तसेंच राह्यचें होतें का? लहानपणापासून कष्टांत दिवस काढले, आताही त्याला सुख मिळूं नये का? माझ्या हृदयांत कालवाकालव झाली. माझा मलाच संताप आला.

मी जायला निघालें.

आता मात्र मी थांबले नाही. मी तडक डोळे पुसले व त्यांच्या घराबाहेर पडलें.

---

# परिवर्तन

( लेखिका– श्रीमंत राजकुमारी **अक्कासाहेब पंत.** )

तिच्या हृदयसिंहासनावर त्याचीच मूर्ती विराजमान झाली होती. तिने त्याच्या रूपाचें वर्णन ऐकलें; त्याच्या गुणांचा परिमल तिच्यापर्यंत येऊन पोहोचला, त्याच्या धवल यशाची चंद्रिका तिजवर वर्षू लागली आणि तिला नकळतच त्याने तिच्या हृदयमंदिरांत प्रवेश केला व एकदम तो तिच्या हृदयाचा राजा झाला.

तिने त्याला पाहिलें नव्हतें. त्याच्याविषयी लोकांच्या तोंडून जें कांही कळे, तें ती हृदयांत साठवीत असे व स्वतःची कल्पना चालवून तिने आपल्या मनःफलकावर त्याची आकृति आखली होती. कल्पनेच्या राज्यांतील त्याची ती दिव्य मूर्ती तिला मोह पाडीत असे.

कितीतरी दिवस ती आपल्या हृदमंदिरांतील देवाला आळवीत होती. प्रेमजलाने स्नान घालणें, प्रेमाश्रूंची माळ गुंफून त्याच्या कंठांत घालणें, बाष्पपुष्पें अर्पण करणें, हें तिचें नित्याचेंच होऊन बसलें होतें. तिने त्याला प्रेमाच्या दिव्य व पवित्र वस्त्रांत आच्छादून टाकलें होतें.

तिने त्याला आपलें सर्वस्व वाहिलें होतें. त्याची मनोभावें सेवा करणें हेंच तिचें पवित्र कर्तव्य होतें.

तो कुठे राहतो ? काय करतो ? याचा तिने पुष्कळ शोध केला, पण तिला समाधानकारक उत्तर मिळेना. त्याच्या देशाला जाण्याची वाट तिला माहीत नव्हती. बिचारी त्याला सर्वस्व वाहून बसली; पण त्याच्या प्राप्तीचा मार्ग मात्र तिला सापडेना ! म्हणून ती खिन्न होई.

कल्पना–साम्राज्यांत ती त्याच्याशीं गुजगोष्टी करीत असतां तिचे कपोल आरक्त होत असत, मधुर स्मिताने तिचे नाजुक ओठ विलग होत, टपोरे नेत्र चकाकत. ती त्या गोड समाधींत कितीतरी वेळ गढून गेलेली असे.

कुणीतरी अरसिकाने तिच्या समाधीचा भंग केला की, तिच्या सुंदर मुखावर नाचणाऱ्या आनंदाच्या लाटा विरून जात व त्यावर गाढ खिन्नता पसरे.

लोक तिला वेडी म्हणत, पण तिला जगाची पर्वा होती कुठे ? तिला एकच ध्यास लागून राहिला होता.

तिची खिन्नता पाहून आईने तिचा विवाह एका सुशील तरुणाबरोबर ठरविला. तिने विवाहाला सम्मती दिली नाही..

‘ बाळ ! असं करूं नये. तुझा विवाह आता झालाच पाहिजे. ’ काकुळतीला येऊन तिचीं आई म्हणाली.

‘ आई ! माझा विवाह कधीच झाला आहे. माझा पति तोच, माझा परमेश्वर तोच, माझं सर्वस्वही तोच ! ’

आई हसली. ‘ वेडे ! अशी आशा धरणें म्हणजे मृग-जलाच्या पाठीमागें धावण्यासारखें आहे. त्याची प्राप्ती तुला होणार? आपण गरीब, तो श्रीमंत.’

‘कांही असूं दे, मी त्याला वरलें आहे. आता मी कुणाचेंच ऐकणार नाही.’ निश्चयाने बोलून ती झटक्याने निघून गेली.

आई खिन्न झाली.

कितीतरी दिवस होऊन गेले. तिची सेवा अखंड चालली होती.

एक दिवस कुणीतरी येऊन तिच्या हृदयेश्वराच्या देशाची वाट तिच्या कानांत हळूच सांगितली.

ती आनंदली, तिचा सुकून गेलेला चेहेरा क्षणांत प्रफुल्ल झाला. तिनें उत्तम वेषभूषा केली, सर्वांत उत्तम अलंकार धारण केले, त्याला अर्पण करण्याकरिता पुष्पांची माला करून घेतली, ती मोठ्या उल्हासाने आपल्या देवाच्या दर्शनाला निघाली,

‘इतकी मोहक वेषभूषा कुणा भाग्यवंताकरिता?’ एकाने प्रश्न केला.

‘माझ्या पतिदेवांच्याकरिता ! ’ मृदु उत्तर आलें.

‘आपला विवाह कधी झाला?’ दुसऱ्याने प्रश्न केला.

'माझ्या अंत:करणांत ज्या दिवशीं त्यांनी प्रवेश केला त्याच मंगल दिवशीं.' गोड उत्तर आलें.

'तूं त्याच्या प्राप्तीच्या आशेवर जिवाचें रान करीत आहेस, पण ती आशा फोल तर होणार नाही ना?' तिसरा प्रश्न.

'अशक्य!' ती पुढे झपाट्याने निघून गेली.

तिचें विचारचक्र सुरू झालें–

'माझ्या हृदयांत प्रवेश करून शेवटीं मला फसविणार तर नाहीस ना? विरहाचें असह्य दुःख मला भोगावयास लावणार नाहीस ना? लोक म्हणतात, माझ्या प्रेमाचा तूं स्वीकार करणार नाहीस. इतका का तूं निष्ठूर आहेस? मी तुझी अखंड सेवा करतें, लोक मला वेडी म्हणतात. मला त्यांची पर्वा नाही. तूं सर्वसंगपरित्याग केला आहेस असं सांगतात, पण मला तें खरं वाटत नाही. मी माझ्या रूपानें, गुणानें, तुला मोहिनी घालीन व तुला माझ्याकडे ओढून घेईन. जगाचा उपद्रव आपल्याला होऊं नये,म्हणून आपण दूर जाऊं.'

अशा तऱ्हेचे विचार करीत ती चालली होती, तिला सांगितलेलें उपवन तिला दिसलें. तिला पाहतांच माना वाकवून वृक्षांनी, लतांनी, फुलांनी, तिचें स्वागत केलें. ती आली म्हणून कोकिळांनी–मैनांनी गाऊन आनंद व्यक्त केला.

'मी लवकरच तुमची सम्राज्ञी होणार आहें हं.' त्यांना गोड आश्वासन देऊन ती पुढे निघाली.

त्याच्या मंदिराजवळ जसजशी ती जाऊं लागली तसें तिचें हृदय उचंबळूं लागलें, कपोल आरक्त झाले, मुखावर आनंद नाचूं लागला, हृदयांत उचंबळणारे भाव नेत्रावाटें स्रवूं लागले

इतके दिवस ज्याचा आपण ध्यास घेतला होता, त्याचें दर्शन–प्राप्ती होणार, या सुखमय कल्पनेने तिच्या अंगावर रोमांच उभे राहिले.

रत्नालंकारांनी विभूषित अशी मूर्ती आपल्या दृष्टीस पडेल, अशी तिची अपेक्षा होती; पण लांबून त्याची मूर्ती पाहतांच तिच्या हृदयावर अनपेक्षित पण जबर घाव बसला!

तो वृक्षाच्या खाली हरिणाजिनावर समाधी लावून बसला होता. त्याचा भव्य भालप्रदेश, सरळ नासिका, पिळदार देहयष्टी, तेजःपुंज मुखकमल पाहून ती मंत्रमुग्ध झाली. त्यागाचें मूर्तिमंत प्रतीकच तें.

त्याच्यासारखीं भगवीं वस्त्रें परिधान केलेले अनेक लोक तिला तेथे दिसले. जगांतील दुःखांचा नाश करून प्राणिमात्रांना सुखी करण्यास सारे झटत होते. तें त्यागी दृश्य पाहून तिला स्वतःच्या स्वार्थी विचारांची लाज वाटली.

'माझ्या स्वतःच्या सुखाहून दुसरा विचार सुचूं नये हं ?' ती स्वतःशीं म्हणाली.

ती धावत त्याच्याजवळ गेली व तिने त्याचे पाय घट्ट धरले.

त्याने आपले विशाल नेत्र उघडले व तिच्याकडे पाहिलें व म्हणाला, 'माई! का येणं केलंस?'

ती अधोवदन झाली.

'माई ! काय इच्छा आहे?'

'आपलं उपदेशामृत पाजून या दासीला पवित्र करावं.'

त्याने तिच्या मस्तकावर हात ठेवला. त्याच्या नेत्रांतील शांत तेज तिच्या नयनांत विलीन झालें.

# बालकाचा पिता

( लेखक– श्री०– **शशाङ्क.** )

शारदी पौर्णिमेची रम्य रात्र !

निळ्या गगनांतून पूर्ण चन्द्र पृथ्वीतलावर सुधेचा वर्षाव करीत होता. चन्द्राचे सेवकगण त्याच्या सभोवार अदबीने उभे होते. चन्द्राच्या अमृतमय किरणांकरिता आसावलेले चकोर चंद्रकिरणांचें आकण्ठ प्राशन करीत होते.

मन्दाकिनीच्या स्वच्छ पुलिनावर कौमुदीच्या पायघड्या अंथरल्या होत्या. चन्द्र आपल्या नाजुक शीतल करांनी मन्दाकिनीस प्रेमाने आलिंगन देत होता! त्यामुळे प्रणयिनी मन्दाकिनीच्या मुखावर उठणाऱ्या लज्जालहरी अतीव मनोहर दिसत होत्या.

सारी पृथ्वी चन्दनरसांत बुडून गेली होती, चन्द्रिकावर्षावाने सारी सृष्टि चैतन्यपूर्ण दिसत होती.

चन्द्राचें हें दृष्ट लागण्यासारखें वैभव मन्दाकिनी आपल्या अगाध हृदयांत साठवून ठेवीत होती.

याच रम्य वेळीं मन्दाकिनीच्या शुभ्र पुलिनावर तरुण संन्यासी दररोजच्या सम्प्रदायाप्रमाणे येऊन बसला होता.

साऱ्या सृष्टींत विलसणारा आनन्द आणि शान्तता अवलोकन करून त्याला अपूर्व समाधान प्राप्त झालें.

तो वयाने अवघा २६ वर्षांचा असून रूपाने अत्यन्त सुन्दर, ज्ञानी व वैराग्यपूर्ण होता. अवन्तीच्या राजाचा तो युवराज होता. पण ऐन तारुण्यांतच त्याने संन्यासदीक्षा घेतली होती. युवराजावर प्रजेचें अत्यन्त प्रेम होतें. त्याचा बाप–राजा देवनाग– अत्यन्त क्रूर, दुर्व्यसनी असून प्रजेचा अमानुषपणें छळ करीत होता. त्याचें आणि युवराजाचें पटेना. युवराजाला राजाने हद्दपार केलें होतें. समाजाची मनोभावें सेवा करण्याकरिताच त्याने संन्यासदीक्षा ग्रहण केली होती. अवन्तीराज्याच्या हद्दीबाहेर मन्दाकिनी नदीच्या तीरावर आश्रम बांधून तो राहिला होता. अवन्तीच्या प्रजेचा तो प्राण होता. त्याच्यासारखा धर्मशील, पवित्र दयाळू साऱ्या देशांत कोणी नव्हता.

स्वतःला विसरून तो संन्यासी धवल कौमुदीसागरांत आनन्दाने विहार करीत होता. सृष्टीच्या अनंत स्वरूपाशीं तो एकरूप झाला होता. जणू कांही त्याला समाधीच लागली होती. समाधिसुखाचा तो अनुभव घेत असतांना एका हुंदक्याने तो शुद्धीवर आला. त्याने इकडे तिकडे विस्फारित नेत्रांनी पाहिलें.

बऱ्याच अन्तरावर नदीतीरींच एक स्त्री शोक करीत होती. संन्यासी दचकला, एकदम उठला– त्याने मनाशी किंचित्काळ विचार केला आणि शांतपणें पावलें टाकीत तो त्या स्त्रीजवळ आला.

'माई ! आपण कां शोक करतां ?' त्याने विचारलें.

तिने अश्रुक्लिन्न मुखकमल वर केलें आणि त्या संन्याशाकडे पाहिलें. फाटक्या पदराखालील बाळाने हालचाल केली. तिने त्याला पोटाशीं अधिक बिलगून धरलें आणि पुन्हा पडत्या पिसाप्रमाणे खाली मान टाकली. वायूच्या झोतांत आपलें जीवन टिकविण्याकरिता धडपडणाऱ्या वर्तिकेचा त्याला भास झाला. 'माई ! आपण कां बरं शोक करतां? रात्रीच्या वेळीं नदीतीरावर एकाकी येऊन शोक करण्याइतकं आपणाला कोणतं दुःख झालं आहे ? ' संन्याशाने कळवळून विचारलें.

'काय सांगू आपणाला? आणि सांगितलं तरी तें आपल्याला खरं सुद्धा वाटणार नाही.' तिच्या मुखावर करुणा, तिरस्कार, असहाय्यता इत्यादि भावनांचा कल्लोळ उडाला होता.

'माझ्या हातून आपलं दुःख निवारण होऊं शकणार नाही का ? ' त्याने जिव्हाळ्याने विचारलें.

पदराआडून बालकाने आपलें मुखकमल बाहेर काढलें. आकाशांतील चन्द्राकडे पाहून हात वर करून ' बाबा बाबा ' असे आनन्दोद्‌गार तो काढूं लागला. बालकाचें निर्व्याज हास्य, निष्पाप खेळ पाहून मातेला किती धन्यता वाटली! पण दुसऱ्याच क्षणीं पूर्वस्मृतींनी तिच्या मुखावर कारुण्यछटा दृग्गोचर झाली.

' माझ्या फुटक्या नशिबाबद्दल मला तितकंसं दुःख होत नाही, पण माझ्या बाळाचं पुढं कसं होणार ? त्याला उज्ज्वल भविष्यकाल नाही !' हताश होऊन ती बोलली.

'म्हणजे ! ' तो आश्चर्याने उद्‌गारला.

' ज्याला आपल्या वडिलांचं नांव आपल्यापुढे लावतां येत नाही, त्याला कसला आला आहे भविष्यकाळ ! '

' कां बरं ? '

' तो कुमारिकेचा पुत्र आहे ! '

' म्हणून काय झालं ? त्याला आपल्या वडिलांचं नांव लावायला काय हरकत आहे ? '

संन्याशाच्या उत्तराने ती एकदम चमकली ! तिने त्याच्या मुखाकडे तीक्ष्ण नजरेने पाहिलें. त्याची मुद्रा गंभीर दिसत असून त्याच्या मुखावरील तेजाने तिच्या हृदयांत अधिक आदर उत्पन्न झाला. ' पण त्यानं वडिलांचं नांव लावलं तर तें कोणाला खरं सुद्धा वाटणार नाही ! '

' कोण त्याचे वडील ?'

' अवन्तीचा राजा देवनाग ! ' ती तिरस्काराने म्हणाली.

' राजा देवनाग ?' त्याच्या मस्तकावर अशनिपात झाला.

' होय, अवन्तीचा राजा देवनाग ! ज्यानं माझा कौमार्यभंग करून वर माझ्या बाळाचं सुद्धा जीवित मातीमोल केलं तोच तो नराधम देवनाग ! ' ती भ्रमिष्टासारखी बोलूं लागली.

'पण हें कसं घडलं?' त्याच्या हृदयांत कल्लोळ उडाला.

'दीड वर्षापूर्वी देवनाग आमच्या गावीं शिकारीकरिता आले होते. मी माझ्या शेताची राखण करीत असतांना त्यांनी मला पाहिलं. माझं रसरशीत तारुण्य व सौन्दर्य पाहून त्यांच्या मनांत पापवासना उत्पन्न झाली. ते थेट मजकडे आले. प्रत्यक्ष राजाची स्वारी आली. मी किती आदरानं त्यांचं स्वागत केलं! राजा हा प्रजेला पित्यासमान, पण याच राजानं माझा कौमार्यभंग केला. हा माझा बाळ त्याच्या पापाची गोड साक्ष देत आहे. कौमार्यभ्रष्ट झाल्याने मला माता-पित्यांनी घराबाहेर काढलं. तेव्हापासून मी वणवण

हिंडते आहें. पतितेला कोण आसरा देणार ? मी राजाकडे बाळाला घेऊन गेलें. राजाने मला राज्याबाहेर हाकलून देण्याची आपल्या सेवकांना आज्ञा केली—मला राजाने दुराचारी ठरविलं. मला आज या मन्दाकिनीच्या तीरावर आणून सोडून दिलं. स्वामिजी ! माझा बाळ मोठा झाला, त्याला सर्व इतिहास समजला, तर त्याला किती दुःख होईल आणि समाजांत त्याला कोण विचारणार ? भविष्यकाली समाजानं बहिष्कृत केल्यानं त्याला हीनावस्थेंत जीवन कण्ठावं लागेल. त्यापेक्षा आताच जलसमाधि घेतलेली बरी नाही का?'

संन्याशाच्या तेजस्वी मुखावर गांभीर्य पसरलें. एका निरपराधी अबलेला व निष्पाप बालकाला राजाच्या—आपल्या पित्याच्या—दुष्टपणामुळे जीविताला मुकावें लागणार ! काय हा दैवाचा खेळ ! आपल्या डोळ्यासमोर दोन जीव जलसमाधी घेणार ! विचारातिरेकाने त्याचें मस्तक सुन्न झालें. काय करावें हें त्याला सुचेना ! त्याच्या हृदयसागरांत विचारांचा वडवाग्नि पेटला.

'स्वामीजी ! सांगा, माझ्या बाळानं कुणाकडे पिता म्हणून बोट दाखवावं ?' तिने सद्गदित होऊन विचारलें.

'माझ्याकडे!' सन्थपणें संन्यासी उद्गारला.

'काय ?' ती चमकून म्हणाली.

'हो, मी बाळाचा पिता होतों !' त्याने प्रेमाने बालकाला उचलून छातीशीं धरलें. संन्यासी—हृदयांतून प्रेमसरिता वाहूं लागली. तिचें हृदय भरून आलें. कृतज्ञतापूर्वक तिने त्याच्या पायावर मस्तक टेकविलें.

# खरें प्रेम !

( लेखिका— श्रीमंत कुमारी **अक्कासाहेब पंत.** )

‘ किती काळा आहेस भाई तूं ! ’ अरुणाचा राकट व काळासावळा हात आपल्या नाजूक केतकी वर्णाच्या हातांत घेऊन उगीचच त्याच्या बोटांशीं चाळा करीत उषा म्हणाली.

‘ असूं दे आम्ही आपले काळे! तूं आहेस ना गोरी ? मग झालं तर ! ’ आपला हात तिच्या हातांतून काढून घेत लटक्या रागाने अरुण म्हणाला.

‘ इश्श भाई ! असा रागावतोस का रे ? मी आपली थट्टेने म्हणालें. ’ आपण हें कांही चांगलें केलें नाही असें वाटून उषेची हसरी मुद्रा खिन्न झाली.

‘ खरंच , मी काळा आहें म्हणून तुला माझी लाज वाटत असेल नाही ? ’

' कांहीतरीच कायरे बोलतोस ? आपलं माणूस काळं असलं तरी आपल्याला तें कधी नकोसं होतं वाटतं ? समज उद्या मीच जर कु...'

' हं ! उगीच काय वाटेल तें बडबडतेस ? ' तिच्या तोंडावर हात ठेवीत दटावणीच्या स्वरांत अरुण म्हणाला.

' अरे! पण मी असं म्हणून कांही मी जर कुरूप होणार असेन तर तें टळणार आहे का ? ' त्याच्या दटावणीकडे लक्ष न देतां उषा म्हणाली.

' पुरे ! पुरे ! फार अक्कल वाहवली ! बड्या इनामदारीण बाई होणार असलां तरी मी असं नाही बोलूं देणार बरं का ताईसाहेब ! आणि जरी आमच्या ह्या चिमुरड्या इनामदारिणीला राग आला तरी इतक्यांत नाही भिणार ! ताईसाहेब ! इतक्यांत नको अधिकार गाजवायला ! '

' हें रे काय भाई ! उगीच काय चेष्टा करतोस ? अशानं मी नाही बोलणार जा ! ' असें म्हणून आपले गुलाबी गाल फुगवून ओठांचा चंबू करून उषा अरुणाकडे पाठ करून बसली. तिच्या त्या बालिश कृतीकडे पाहून तिला आणखी चिडवायच्या हेतूने तो म्हणाला, ' पण ताई ! एवढी मोठी इनामदारीण झाल्यावर तूं तुझ्या ह्या गरीब भावाशीं बोलशील का गऽ ? शिवाय मी कांही तुझ्यासारखा सुंदर नाही, तेव्हा लोक माझी चेष्टा करतील नाही का ?'

त्याच्या चेष्टेकडे लक्ष न देतां एकदम गंभीर होऊन उषा म्हणाली, 'भाई! लोकांनी चेष्टा केली म्हणून मी तुझ्याशीं बोलणार नाही, असं का तुला वाटतं ? शि मला तुझं अंतःकरण पाहिजे आहे, रूप क्षणिक आहे. ' केवळ रूपावर

भाळणारं प्रेम खरं प्रेम होऊं शकत नाही' असं मागं एकदा तूंच म्हणाला होतास ना ? मला कांही समजत नाही. मला फक्त तूं सांगशील तसं वागायचं एवढं कळतं. '

' ताई ! तूं माझ्याइतकी जरी शिकलेली नसलीस तरी माझ्याहूनहि तुझे विचार उदात्त आहेत. ताई गऽ! मी इंग्लंडला गेल्यावर मला पत्र पाठवशील का? तुझा वियोग मला सहन होणं शक्य नाही; निदान पत्रांत तरी भेट देशील का ? '

' हो, मला तितकं स्वातंत्र्य असेल तर जरूर पाठवीन पत्र ! ' आपले विशाल नेत्र एका फलझाडावर स्थिर करीत गंभीरपणाने उषा म्हणाली.

आपल्या बोलण्यामुळे आपली ताई गंभीर आणि खिन्न दिसत असलेली पाहून अरुण म्हणाला, ' नाही तर आम्ही आपलं पत्र लिहावं आणि आमच्या ताईसाहेबांना आपल्या पतीच्या सेवेंत आमचं पत्रसुद्धा वाचायला सवड नसावी! '

' झाली का पुन्हा तुझी चेष्टा सुरू ? आता मी आपली जातेच कशी ! ' असें म्हणून आपलें पातळ सरकवून उषा उठली आणि निघून जाऊं लागली. इतक्यांत ' अरुण ! अरे अरुण ! ' अशी आईची हाक कानीं आली, म्हणून अरुणहि उठला. दिवेलागणी झाली तरी अजून अरुण व उषा बागेंत आहेत असें पाहून घराच्या मागील दारांत उभ्या राहून मनोरमाबाई–अरुण उषेची आई त्यांना हाक मारीत होत्या.

' अरे अरुण ! तिला घेऊन संध्याकाळ झाली तरी बागेंत बसतोस, कितीदा तुला सांगायचं ! '

'बघ ग आई ! भाई माझी उगीच चेष्टा करतो !' आधीच गुलाबी असलेले उषेचे गाल लाजेने जास्तच आरक्त झाले होते आणि चेष्टेपासून होणारा आनंद कितीहि लपवण्याचा प्रयत्न केला तरी तो खोडमाळ आणि तेजस्वी डोळयांतून दिसतच होता. अगदी बालिशपणें ती आपल्या आईच्या गोटपाटल्यांशीं खेळत होती. मनोरमाबाईंनी एकदा कौतुकानें व अभिमानाने तिच्याकडे पाहिलें. खरेंच तिच्या सौंदर्यामुळे मध्यम स्थितींतील मुलगी एक बडी इनामदारीण होणार होती. तिच्या तिघी बहिणी कांही तिच्यासारख्या सुन्दर नव्हत्या, म्हणून त्या तिचा हेवा करीत. उषेला तिच्या स्वतःच्या रूपाची जाणीव होती, पण गर्व नव्हता. तिला सर्वात प्रिय म्हणजे तिचा भाई व भाईचें सर्वस्व त्याची ताई!

'खरोखरच आई! मी अगदी विसरलोंच. अप्सरेलाहि लाजविणाऱ्या आमच्या ताईसाहेबांना दृष्ट लागेल नाही का?' असें म्हणून तो घरांत गेला. त्याच्या पाठीमागून घरांत दोघीही गेल्या. मनोरमाबाईंनी प्रथम आपल्या लाडक्या लेकीची मीटमोहऱ्या घेऊन दृष्ट काढली आणि चुलींतील राख तिच्या कपाळाला लावली. अरुण हें सर्व कौतुकाने पहात होता.

मोठ्या थाटाने उषेचा ...पूरच्या इनामदारांशीं विवाह झाला. उषेचे वडील हे मध्यम स्थितींतले गृहस्थ होते. त्यांना चार मुली व एक मुलगा अशीं पांच अपत्यें होतीं. सर्व मुलांत उषा फारच देखणी होती. ज्या इनामदाराशीं उषेचा विवाह झाला, त्यांच्याच इनामांतील एका गावांत हे सुखी कुटुंब रहात होतें. एक दिवस कांही कामानिमित्त ...पूरचे

इनामदार त्या गावीं आले आणि सुंदर उषेने त्यांचें मन वेधून घेतलें ! त्यांनी तिला मागणी घातली. ऐपतीबाहेर खर्च करून उषेच्या वडिलांनी थाटाने लग्नसमारंभ पार पाडला.

आज उषा सासरीं जाणार होती. तिला आनंदापेक्षा आपल्या आईचा आणि भावाचा वियोग होणार म्हणून वाईट वाटत होतें. तिने भक्तिभावाने देवाला नमस्कार केला. आईला नमस्कार करून तिने एकदम आईच्या गळ्याला मिठी मारली. मनोरमाबाईंनी तिला हृदयाशी धरलें आणि हुंदके देत चार उपदेशाच्या गोष्टी सांगितल्या. बालिश आणि प्रेमळ उषेला आईच्या विरहाची कल्पना असह्य होत होती. मोठ्या कष्टाने मनोरमाबाईंनी तिला निरोप दिला, ती आपल्या भाईजवळ गेली.

'भाई येतें' असें सद्गदित कंठाने म्हणून आपलें अश्रु लपविण्यासाठी ती खाली पाहूं लागली. अरुणाने चट्कन् तिचे हात धरले आणि ते दाबीत 'ताई' अशी तिला हाक मारली.

'भाई ! आता पुन्हा केव्हा भेटणार रे! ' मोठ्या प्रयासाने थोपविलेला अश्रुप्रवाह दुप्पट जोराने बाहेर पडला.

'ताई! रडूं नको गऽ! सासरीं सुखाने नांद! मी इंग्लंडहून येतांच तुझ्याकडे येईन. '

'भाई! लवकर येशील ना ?'

'हो, अगदी लवकर.'

'हं ! चल बरं उषा आता' असें उषेच्या वडिलांनी म्हणतांच अरुणने उषेचे हात सोडले आणि उषा आपल्या शालूचा भरजरी पदर सावरीत मोटारींत जाऊन बसली. उषा मोटारींत जाऊन बसली, तरी अरुणची दृष्टी तेथून हालेना.

'ताई आपल्याला पुन्हा अशीच दिसेल ना ?' अशी वेडी शंका त्याच्या हळव्या मनाला चाटून गेली.

❦ ❦ ❦

'इश्श ! इतकं सारखं टक लावून काय पहायचं?' लाजेने उषा खाली पाहून आपल्या अंगठ्याचे नखाने जमीन उकरीत पतीला म्हणाली.

'तुझ्या मुखावरून दृष्टीच काढावीशी वाटत नाही, त्याला मी तरी काय करूं! तूं माझी पत्नी आहेस हें पाहून लोक माझा हेवा करतात व मग मला फारच आनंद व अभिमान वाटतो.'

'इतका का माझ्या रूपाचा आपल्याला अभिमान वाटतो?'

'कां बरं वाटूं नये ? तुझ्यासारखी रूपवान् पत्नी मिळायला भाग्य लागतं! '

'रूप ही एक देवाची देणगी आहे. पण रूपापेक्षाहि आपल्याला हृदयाचं सौंदर्य जास्त मोलाचं नाही वाटत ?' आपल्या पतीकडून काय उत्तर येतें, हें पाहण्याकरिता तिने वर पाहिलें.

'हें बघ आलं तुझं हृदय ! अग, जें आपल्याला दिसतं तें आपण सौंदर्य म्हणतों बुवा ! आता तुझं तें हृदयाचं सौंदर्य कांही आपल्याला कळत नाही.' कपाळाला आठ्या घालून पतिराज बोलले.

'पण आपलं माझ्यावर प्रेम आहे कां माझ्या रूपावर आहे? ' जणू काय आपल्या पतीच्या मनाची परिक्षाच पहावयाची आहे, ह्या हेतूने उषा प्रश्न टाकीत होती.

'अग! तूं आणि तुझं रूप दोन का आहेत ? माझं तुझ्या-वर प्रेम नाही असं कां तुला वाटतं ? '

' पण समजा उद्या मी कुरूप झालें तर मला टाकून द्याल का ? '

पतिराज थोडेसे घोटळले ! ' कांही तरीच काय बोल-तेस ? असं कुणी टाकून देतं वाटतं ? ' असें म्हणून तिच्या हाताला धरून त्यांनी तिला आपल्याजवळ बसवून घेतलें.

उषा खिन्न झाली; कारण तिच्या पतीचे शब्द अन्तः-करणापासून निघालेले नाहीत, असें तिला वाटलें.

  

उषा एका वर्षानंतर मोठ्या मिनतवारीने पतीकडून परवानगी घेऊन माहेरीं आली होती. माहेरीं आल्यापासून तिला पिंजऱ्यांतून सुटून आलेल्या पक्ष्याप्रमाणें झालें होतें. ती एखाद्या फुलपाखरासारखी ह्या खोलींतून त्या खोलींत हिंडत होती. पण तिचा भाई नसल्यामुळे तिला चुकल्या–चुकल्यासारखें वाटत होतें. त्यामुळे तिच्या आनंदांत विरजण पडलें ! ती तिच्या आवडत्या बागेंत गेली, पण तिचा भाई नसल्यामुळे तिला तिथे उभें राहवेना. तेथून ती आपल्या खोलींत गेली आणि टेबलावर असलेल्या भाईच्या फोटोला ' भाई केव्हा येणार ? ' असें विचारूं लागली. शेवटीं तिलाच आपल्या वेडेपणाची लाज वाटून तिची आई माजघरांत तांदूळ निवडीत होती तिथे ती आली.

' आई! मला दे ना तांदूळ निवडायला ! '

' कशाला तें ? माझंहि झालंच आहे आता ! '

'हें गऽ काय आई! परक्यासारखी काय वागवतेस?'

'तसं नव्हे ग! पण तुला आता कसं काम सांगायच? बड्या इनामदारणीला का काम सांगायचं?' मनोरमाबाईंना वाटलें की आपलें शेवटचें वाक्य ऐकतांच उषा लाजेल आणि 'इश्श' म्हणून लटका राग आणील. पण तसें कांहीच झालें नाही. आपल्या डोळ्यांतील अश्रू दिसूं नयेत म्हणून उषा चट्कन् उठून बागेंत जाऊन बसली अन् मन-मुराद रडली! 'आई! तूं सुद्धा मी श्रीमंत झालें म्हणून माझ्याशीं परक्यासारखं वागणार का गऽ?'

  

जवळच एक देवस्थान होतें, तेथे जत्रा बरीच भरत असल्यामुळे उषेच्या घरची सर्व मंडळी उषेला घेऊन त्या ठिकाणीं गेली. तेथून आल्यावर एकाएकी उषेला ताप आला आणि तो सारखा वाढत गेला. सर्व मंडळी घाबरून गेली. शेवटीं देवी निघाल्या आणि ताप उतरला. त्या देवीच्या आहारीं उषारूपी सुंदर आणि नाजुक फूल गेलें! संदर उषा कुरूप झाली. ज्या उषेकडे पाहतांच सर्वां-चे नेत्र त्याच मुखावर स्थिरावत; तेच नेत्र आता उषेकडे पहावयास धजत नव्हते. तिचा विशाल आणि बुद्धिमत्तेचा निदर्शक असा भालप्रदेश आज देवीच्या वणांनी आच्छा-दिला गेला होता, तिचे तेजस्वी आणि टपोरे डोळे खोल गेले होते, तेजांची चमक लोपली होती. गुलाबी गुबगुबीत गाल चोपटून जाऊन फिकट दिसत होते. लालबुंद ओठ सुकले होते. मधाच्या पोत्यांतून मध काढून घेतांच तें जसें

निर्जीव बनतें, तीच स्थिती ओठांची झाली होती. अप्सरेलाहि लाजविणाऱ्या तिच्या रूपाची होळी झाली आणि उमलत असलेल्या फुलाची वाढ खुंटून तें निर्जीव झालें. उषा कुरूप झाली, हें ऐकतांच उषेला क्षणभर सुद्धा सोडन न राहणारे तिचे प्रेमळ (?) पतिराज यांनी आज सहा महिन्यांत तिची विचारपूस सुद्धा केली नाही. तिच्या आईबापाला अतिशय वाईट वाटलें. पण करणार काय? बिचारीला इतकें वैभव असूनही, आज ती आपल्या हक्काच्या घरीं न जातां आईबापाच्या घरीं बहिणींचीं कुचकीं बोलणीं सहन करीत आपल्या लाडक्या भावाची मार्गप्रतीक्षा करीत दिवस कंठीत होती.

'खरंच सौंदर्याच्या प्रभाव केवढा असतो ! जोंपर्यंत सौंदर्य होतं तोंपर्यंत मला कांही कमी नव्हतं, पण आज ? आज मी कुरूप होतांच मला सर्वांनी दूर लोटलं. त्यांनी मला टाकलं आणि माझ्या जागीं दुसरी येऊन बसली. आईचं प्रेम कमी झालेलं नाही; पण– माझं नशीबच वाईट म्हणून तिची माझ्याबद्दलची सहानुभूति नष्ट झाल्यासारखी वाटते. बाबा तर आताशा माझ्याकडे शक्य तितकं बघायचंच टाळतात. 'नाकानं वांगीं सोलीत होती नाही का ?' असें म्हणून बहिणी त्रास देतात. भाई ! तूंहि असंच करणार का ? सुंदर होणं आणि कुरूप होणं हा दोष माझा का ? सगळ्यांनी जर प्रथमच मला अतिप्रेमानं वागविलं नसतं, तर मला इतकं दुःख झालं नसतं. पण नंदनवनांतून मला खाली खोल खोल दरींत ढकलून दिल्यावर नाही का वाईट वाटणार ? भाई ! तूं इथं आल्यावर माझ्याशीं असंच वागणार कारे ?'

'उषा! भांडीं घरांत आणून ठेव गऽ !' असे आईचे शब्द कानीं पडतांच उषा विचारतंद्रींतून जागी झाली आणि भांडीं घेऊन घरांत गेली.

' आज अरुणाची तार आली आहे. आणखी आठ दिवसांनी तो मुंबईला येणार आहे.' तारेचा कागद हातांत घेऊन उषेचे वडील आंत आले.

' खर का ? ' मनोरमाबाई आनंदाने म्हणाल्या. अरुण खरंच येणार आहे कीं काय, यांची खात्री करून घेण्याकरिता उषेने विचारलें, 'बाबा ! भाई खरंच येणार का?'

'हं!' असें म्हणून त्यांनी उषेकडे पाहून एक दीर्घ सुस्कारा सोडला. उषेच्या डोळ्यांत अश्रुबिंदु चमकले. ते दुःखाचे होते कीं आनंदाचे होते, कुणाला माहीत !

  

उद्या भाई येणार !

' भाई ! तूं माझ्या भेटीकरिता किती आतुर झाला असशील ! मी तुला आता लवकर भेटणार म्हणून तुला आनंद झाला असेल; पण मला पाहतांच तुझा आनंद मावळून जाणार ! तुला वाईट वाटेल ! पण तुला माझा तिटकारा वाटणार नाही ना ? तूं माझ्याशीं पूर्वीसारखाच प्रेमानं वागशील ना ? ' तिला एकाएकी रडूं कोसळलें. बराच वेळ रडल्यावर तिचें मन हलकें झालें.

आज अरुण येणार, म्हणून मनोरमाबाईंनी गोडधोड केलें होतें. उषा सारखी खिडकींत जाऊन लांबवर नजर टाकून

मोटार दिसते कीं काय, तें पहात होती. तिची चाललेली ही धावपळ पाहून मनोरमाबाईंना वाटलें की, उषा, अरुण येतांच त्याच्या पुढे जाईल आणि मग त्याच्या मनाला एकदम धक्का बसेल; म्हणून त्या उषेला म्हणाल्या, 'उषा! अरुण येतांच एकदम त्याच्यापुढे जाऊं नकोस हं! '

' नाही गऽ आई ! एवढं सुद्धा मला कळत नाही का? ' असें अगदी केविलवाण्या स्वराने म्हणून उषा आपल्या माडी-वरील खोलींत जाऊन बसली. मोटार दारापाशी थांबल्याचा आवाज उषेने ऐकला. तिला वाटलें चटकन् जाऊन भाईला मिठी मारावी पण– पण– !

' आई ! ताई सासरीं आहे का ? ' अरुणाने देवाला व आईला नमस्कार करून पहिला प्रश्न विचारला.

' नाही. '

' मग ? '

'इथंच आहे' नाइलाजाने मनोरमाबाई म्हणाल्या.

'मग ताईसाहेबांची स्वारी कुठं दिसत नाही? माले! आण गऽ तिला बोलावून.'

'नको ! मग येईल सावकाश ! तूं आता हात पाय धू आणि पाटावर येऊन बैस. तुझ्या आवडत्या करंज्या केल्या आहेत !'

'थांब ! ताई कुठं आहे तिला भेटतों आणि मग बाकीचं' असें म्हणून तो माडीवर गेला आणि त्याने उषेच्या खोलीचें दार ढकललें. दार वाजतांच उषा दचकून उभी राहिली आणि तिने दारांत उभ्या असलेल्या अरुणाला आर्त स्वराने 'भाई!' अशी हाक मारली.

'कोण ताई ? माझी ताई- तूंच' कुरूप झालेल्या उषेकडे आश्चर्याने निरखून पहात अरुण म्हणाला.

'भाई! ओळखलं नाहीस मला ?' इतकें म्हणून तिला एकदम घेरी आली आणि ती पडणार इतक्यांत तिला अरुणने सावरलें.

'ताई !' तिच्या केसावरून हात फिरवीत सद्गदित स्वराने अरुण म्हणाला.

'भाई! तूं खरंच आलास ? पण मला पाहून तुझा आनंद मावळला ना ?' खाली पहात उषा म्हणाली.

'तुम्ही मला कुणीच कसं कळवलं नाही ?' आपल्या वडिलांकडे पहात अरुण म्हणाला. 'ताई ! वर बघ ना गऽ ! सर्व प्रकार माझ्या लक्ष्यांत आला बरं. तुला मीहि दूर लोटीन् असं वाटलं होय ? मला तुझं रूप नको आहे; मला तुझं सुंदर अंतःकरण पाहिजे आहे. तें पहिल्यासारखं आहे ना? मग झालं तर !'

'भाई! खरंच मी तुला पूर्वीसारखीच आवडते ?' साश्रु नयनांनी त्याच्याकडे पहात उषा म्हणाली.

'होय बरं ताई ! तूं माझीच आहेस! आणि मीहि तुझाच आहे. ताई ! बाह्य रूपावर भाळणारं प्रेम खरं प्रेमच होऊं शकत नाहीं !' असें म्हणून त्याने अत्यंत प्रेमभरानें तिच्या केसांवरून हात फिरविला.

---

# शून्य-हृदय ?

( लेखक– श्री० **शशाङ्क** )

भगवान् सहस्ररश्मी विश्रान्तीकरिता अस्ताचलामागे प्रयाण करीत होता. नभोमण्डलांतील प्रतिक्षणी बदलणाऱ्या मेघखण्डांचें अतीव मनोहर सौन्दर्य लोपूं लागलें होतें.

दिवसभराच्या कष्टाने श्रमित झालेले शेतकरी खांद्यावर आसूड टाकून बैलांना घेऊन उदास अन्तःकरणाने घराकडे परतत होते.

आपल्या पिलांची भेट घेण्यास उत्कंठित झालेले अधीर पक्षी आपापल्या घरट्यांकडे धाव घेत होते.

जीवमात्रांची चाललेली शेवटची धडपड ऐकूं येत होती.

मेदिनीला ग्रासण्याकरिता क्षितिजाकडून अंधकार अजगरासारखा हळू हळू येत होता. अज्ञात भीतीने जीवनमात्राच्या हृदयाचा थरकाप उडत होता.

अंधकाराने सारी मेदिनी–आकाशही ग्रासून टाकलें. सारे जीव आपापल्या निवासस्थानांत दुःखाचे सुस्कारे टाकीत

होते. याच अंधाऱ्या रात्रीं खिडकीशेजारीं बसून अन्तराळांतील तारकांशीं तो गुजगोष्टी करीत होता. कुणाला वाटलं असतं की, याला वेडच लागलं आहे ! त्याचे अधिरे नेत्र आकाशाकडे लागले होते. वर्षाकाळीं नभःप्रांगणांत जमणाऱ्या कृष्ण मेघांप्रमाणे त्याच्या तेजस्वी नेत्रांत व्याकुळ भाव तरंगत होते. आज त्याचें हृदय शून्य होतें ! पण त्याच्या रोमरोमांतून आनन्द सळसळत होता.

अनेक वर्षें हृदयाशीं बाळगलेली एकमेव आस आज पूर्ण झाली, म्हणून तो आनन्दाच्या अत्युच्च शिखरावर विराजमान झाला होता. पण !– त्याच्या रिक्त हृदयांत उसळणारें दुःख अश्रूंच्या रूपाने पाझरूं लागलें होतें.

सुख–दुःखाच्या मिश्र भावनांनी तो गुदमरला होता.

त्याच्या मुखावर व नेत्रांत परस्परविरुद्ध भावनांचा कल्लोल उडाला होता.

किती तरी वेळ अशा मुग्ध मनःस्थितींत तो बसला होता !

शिशिरकालीन हिमवायूच्या झुळकीने त्याचें अंग थरारलें आणि तो भानावर आला. त्याने मस्तक वळविलें. सारी खोली अन्धकाराने व्यापिली होती. त्याने सगळीकडे नजर फेंकिली. अन्धकाराची भेसूरता मात्र त्याला जाणवली.

त्याने दीप पेटविला. वर्तिकेचा मन्द प्रकाश अन्धकार घालविण्याचा विफल प्रयत्न करीत होता. त्या मन्द प्रकाशाने खोलीला अधिकच भेसूर स्वरूप प्राप्त झालें होतें. सुवर्ण–ज्योतीवर झडप घालून पतंग अपूर्व त्यागाच्या द्वारें आपलें प्रेम व्यक्त करीत होता.

खोलीच्या कोपऱ्यांत त्याने नजर फेकिली !

# शून्य-हृदय ?

त्याच्या कठोर तपश्चर्येची फलप्राप्ति व्यक्त स्वरूपांत विराजमान झाली होती. अनेक वर्षें खपून त्याने ती मूर्ति घडविली होती.

अनेक वर्षें त्याच्या मनश्चक्षूपुढे एक सौंदर्यपूर्ण दृश्य भासमान होत होतें. कल्पनामेघावर आरूढ होऊन आपल्या सौंदर्यदेवतेच्या प्रतिक्षणीं वर्धिष्णु सौंदर्याचें तो आकण्ठ पान करीत होता. दररोज रात्रीं त्याची सौंदर्यदेवता त्याला तारकांच्या समूहांत अस्पष्ट भासमान होत होती. त्या भासमान होणाऱ्या सुन्दर दृश्याला मूर्त स्वरूप देण्यासाठी त्याने गेलीं अनेक वर्षें अविश्रान्त परिश्रम केले होते. कालच त्याला उठतां बसतां भासमान होणाऱ्या सौंदर्याने पार्थिव स्वरूप धारण केलें होतें. भासमान होणारी सौंदर्यप्रतिमा मूर्तीच्या स्वरूपाने दृश्य झाली खरी, पण आज सकाळ-पासून त्याला चुकल्याचुकल्यासारखं वाटूं लागलं होतं. ती भासमान होणारी सौंदर्यमूर्ति आता भासमान होईना आणि म्हणूनच त्याचें हृदय शून्य झालें होतें. कितीहि प्रयत्न केला तरी त्याच्या हृदय–सिंहासनावर ती सौंदर्यमूर्ति कांही अधिष्ठत होईना.

तो हळू हळू पावलें टाकीत त्या मूर्तीकडे गेला ! त्याची अतुलनीय कलाकृति त्याच्या समोर उभी होती.

दोन प्रेमी जीवांचा अपूर्व संगमच तो !

रजनी उभी होती. तिच्या अंगप्रत्यंगांतून सौंदर्य व तारुण्य निथळत होतें. उजवा गुडघा तिने किंचित् वाकविला होता. कमरेला उजव्या बाजूला किंचित् बाक देऊन तिने आपलें ऊर्ध्वांग मागे वळविलें होतें. आपल्या डाव्या प्रस्फुट वक्षः-

स्थलावर डावा हात ठेवला होता. तिच्याच मागे पर्वताला टेकत रजनिनाथ उभा असून त्याने तिची हनुवटी आपल्या डाव्या हाताने धरली होती व उजव्या हाताने रजनीच्या नाजूक कमरेला त्याने विळखा घातला होता. रजनीने आपला उजवा हात रजनिनाथाच्या गळ्याखालून नेऊन त्याच्या मस्तकावर ठेविला होता. त्याच्या विशाल वक्षःस्थलावर आपली कोमल काया व मस्तक टेकवून ती उभी होती आणि तो तिच्यावर चुम्बनांचा वर्षाव करीत होता.

किती रमणीय आणि कलापूर्ण दृश्य हें !

मूर्तीच्या प्रत्येक अंगांतून कलावानाचें नितान्त कौशल्य व्यक्त होत होतें. अनेक वर्षांच्या तपश्चर्येचें फल समोर पाहून त्याच्या नेत्रांत किंचित्काल समाधानाचे भाव तरंगून गेले.

आनन्दातिशाने त्याने दोन्ही हात उभारले व तो मोठ्याने पुटपुटला– ' माझ्या जीविताचा आनन्द ! ' गुडघे टेकून त्या मूर्तीच्या पायांवर त्याने आपलें मस्तक नमविलें. कां नाही त्याला आनंद वाटणार ?

रजनीच्या मोहक चेहेऱ्यांत त्याला आपल्या प्रेमळ मृत-पत्नीचा भास होत होता ! रजनिनाथाच्या आणि त्याच्या मुखांतील साम्य एखाद्या अंधाने सुद्धा ओळखलें असतें.

दूरच्या खेडेगावांतील रखवालीस असलेल्या रामोशांचा अस्फुट ध्वनि कानांवर आला आणि तो आपल्या गुंगींतून भानावर आला. तिला आपाद न्याहाळण्याकरिता त्याने आपलें मस्तक वर उचललें. पण कुठं गेली ती ?

घनतिमिराशीं झगडणारी कापरी ज्योत वायूच्या मोठ्या झुळकीबरोबर मालवली गेली आणि पुन्हा सारी खोली

घनान्धकाराने भरून गेली.

ती तिथेच होती ! तिच्या हिमयुक्त व कठीण पद-कमलांचा स्पर्श त्याच्या अधरास भासमान होत होता.

त्याच्या हृदयसिंहासनावर पूर्वी भासमान होणाऱ्या सौंदर्य-देवतेचें तें प्रत्यक्ष प्रतीक होतें.

शशिकला मावळली होती; पण तिचीं रुपेरी किरणें अजून अशोकाच्या शेंड्यावर पर्णांचें चुम्बन घेण्याकरिता घुटमळत होतीं. लाजऱ्या माधवीने नुकतीच कुठे पाकळ्या उघडण्यास सुरवात केली होती. तिचा मित्र अनिल तिचा सुगन्ध दशदिशांत पसरविण्याची कामगिरी करण्यांत गुतला होता.

निराश होऊन सद्‌गदित कण्ठाने कलावान् म्हणाला, माझ्या जीवनाचा प्रकाश ! कुठं आहेस तूं ? '

' इथं, तुझ्या हृदयांत ! ' उत्तर आलें.

पण कुणी उत्तर दिलं ?

तो क्षणमात्र गोन्धळला. त्याच्या हृदयांत आनन्द मावेनासा झाला. खोलीच्या कोपऱ्यांत–समोरच–त्याने अधिऱ्या नेत्रांनी पाहिलें. त्याने दोन्ही हात पसरले व धडधडत्या अन्तःकरणाने तो बोलला– ' ये ये, तुझ्या कोमल शरिराचा ऊबदार स्पर्श मला होऊं दे. मला एकदा तुला डोळे भरून पाहून घेऊं दे ! माझ्यावर तूं आपल्या सुधादृष्टीचा वर्षाव कर ! बोल ना ? पण तूं कुठं आहेस ? '

स्वप्नमय वातावरणाला शोभेल इतक्या सौंदर्यपूर्ण व मधुर शब्दांत उत्तर आलें –' इथं तुझ्या हृदयांतच मी आहें! '

' माझ्या हृदयांत ? ' त्याने निराशापूर्ण स्मित केलें. ' नाही ! मला पूर्ण माहीत आहे. उघड्या खिडकींतून

जेव्हा सकाळीं उषेने पाऊल न वाजवितां प्रवेश करून मला स्पर्श केला, परिमलयुक्त दक्षिण वाताने माझ्या मूर्धजांचें चुम्बन घेतलें, तेव्हा सृष्टीच्या सौंदर्यात अथवा रंगांत तुझें स्वरूप अवलोकन करावें म्हणून जागृत झालों. तरी पण हें माझं हृदय अगदी रिक्तच राहिलं !

'मेघांचा गडगडाट झाला. गगनांत चपला नृत्य करूं लागली. भयंकर वादळांत तुझा निळा अंचल फडफडत आहे, असा मला भास झाला. संध्याकाळ होऊं लागली, तुझ्या पावलांचा ध्वनि माझ्या कानावर पडत आहे, असा मला क्षणोक्षणीं भास होऊं लागला ! तरी पण तुझ्या-माझ्यांत अमर्याद अन्तर आहे, अशी जाणीव मला झाली. बोल ! सांग, पुन्हा सांग, तूं कुठं आहेस ? '

' तुझ्याच हृदयांत! ' ती मंजुळ स्वरांत उद्गारली.

' मग तूं माझ्या दृष्टीला दिसत कशी नाहीस ? '

' कारण तूं अन्तर्दृष्टीने पहात नाहीस ! तुला मी सगळी-कडे भासमान होतें; पण मी तुझ्या हृदयांतच तुझी मार्ग-प्रतीक्षा करीत आहें. '

कलावानाने आपलें जड झालेलें मस्तक तिच्या-मूर्तीच्या पायांवर ठेविलें. मूर्तीच्या पायाला आपल्या क्षीण हातांनी विळखा घातला. जणू कांही स्वप्नांतल्यासारखाच तो पुट-पुटला- ' पण माझं हृदय खरंच शून्य आहे- अगदी पूर्ण रिक्त आहे ?'

